


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

## अनुक्रम



---

**प्रकाशन :** त्रैमासिक ( जानेवारी, मार्च, जून, ऑक्टोबर )

**संपादन–समिती :** अशोक रा. केळकर ( प्रमुख ), कल्याण काळे, अंजली सोमण, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** ए–२ परिमल, १२३९–ए आपटे रस्ता, पुणे ४११००४ ( दूरध्वनी ५९२५८ )

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, १।८ आगरकर नगर, पुणे ४११००१ ( फोन ६३४९६, शिवाय फोन ५४०६९ )

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच असे नाही.

---

संपादक : अशोक रा. केळकर / प्रकाशक : मराठी अभ्यास परिषदेसाठी प्र. ना. परांजपे / मुद्रक : चिं. स. लाटकर, कल्पना मुद्रणालय, ४६१/४ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०

संपादकीय

# म्हणी, सुभाषितं, आणि अवतरणं

माझ्या माहितीच्या एक प्राध्यापिका आहेत. त्यांचं वैशिष्ट्य हे की, त्यांना बोलताना पदोपदी म्हणींचा वापर करायचा सोस आहे. आपण कधीही न ऐकलेल्या म्हणी, वाक्प्रचार या बाई अगदी सहजपणे बोलून जातात. सडाफटिंग माणसाबद्दल बोलताना 'घर ना दार, देवळी बिऱ्हाड' अशी म्हण वापरूनच त्या त्यांचं वर्णन करतील. अपात्र माणसाला मोठेपणा मिळाला हे सांगताना त्यांना 'गांवळ्या गावात गाढवी सवाशीण' या म्हणीचं स्मरण झाल्याशिवाय राहाणार नाही. 'अमुक माणूस कंजूष आहे' हे सांगताना त्या 'तो उष्ट्या हाताने कावळा हाकणार नाही' याच भाषेत सांगतील. अशक्त माणसाला 'पाण्याचं पितर' म्हणतील तर हिंडफिऱ्या माणसाला 'बारा पिंपळावरचा मुंजा' म्हणतील. साधं बोलणं त्यांना माहीतच नाही जणू. आजकाल अशी म्हणींची व वाक्प्रचारांची भाषा प्रचारातून गेली आहे. त्यामुळे जी भाषा सत्तरीतल्या बाईंच्या तोंडी अपेक्षित असते ती या तिशीतल्या बाईंच्या तोंडून ऐकताना गंमत वाटते.

आपल्या पोशाखातल्या फॅशन्स सारख्या बदलत असतात. प्रत्येक व्यक्ती नकळत का होईना या बदलत्या फॅशन्सच्या आहारी जात असते. त्यामुळे कालच्या पिढीच्या वेषभूषेपेक्षा आजच्या पिढीच्या वेषभूषेमध्ये अपरिहार्यपणे फरक पडत जातो. आज कोणी पुरुष शिंदेशाही पागोटं घालून ऑफिसात जात नाही किंवा कुणी मुलगी नऊवारी साडी नेसून कॉलेजात जात नाही. वेषभूषेच्या फॅशन्स बदलून जातात तशा भाषेच्याही फॅशन्स बदलत जातात. मी महाविद्यालयात शिकत असताना तरुणांच्या तोंडी जी भाषा असे, तिच्यापेक्षा आजच्या महाविद्यालयीन तरुणांची भाषा खूपच बदललेली आहे. प्रत्येक पिढीला आपली भाषा आपल्या पोशाखाप्रमाणेच अगदी नवी, ताजी असावीशी वाटत असते.

असं असताना, जर एखादी व्यक्ती रूढ फॅशन सोडून जुन्या पद्धतीची वेषभूषा करून आली तर लगेच इतरांचे लक्ष वेधून घेते, तसं या बाई जुन्या वळणाची म्हणींची भाषा बोलतात तेव्हा त्यांची भाषा चटकन लक्ष वेधून घेते. मात्र वेषभूषेच्या जुनेपणाबद्दल पाहणाऱ्याच्या चेहऱ्यावर जशी नापसंती उमटते तशी या बाईंची भाषा ऐकणाऱ्याच्या चेहऱ्यावर उमटत नाही. उलट त्या ही भाषा कशी बोलतात याचं त्याला कौतुकच वाटत असतं.

हल्ली आपण अशी म्हणींची भाषा वापरणं जवळजवळ सोडून दिलं आहे. जुन्या पिढीतल्या व्यक्तींच्या तोंडी, विशेषतः स्त्रियांच्या तोंडी ती भाषा बहुतकरून असे. खि. बा. लक्ष्मीबाई टिळकांच्या स्मृतिचित्रात अशी भाषा आपल्याला दिसून येते. ‘ संशयकल्लोळ ’ नाटकातील कृत्तिकेच्या तोंडची भाषा अशीच म्हणींची रेलचेल असलेली आहे. आपल्या घरातील सत्तरीच्या घरातील बायकांच्या तोंडी कदाचित् अजूनही ती ऐकू येईल. पण पन्नाशीच्या आसपासच्या व्यक्ती आता ती भाषा वापरीतनाशा झाल्या आहेत. तिशी पस्तिशीच्या व्यक्तींच्या तोंडी तर ती भाषा जवळजवळ अशक्यच आहे. आपल्या बोली व्यवहारातून म्हणींचं उच्चाटनच झालं आहे. याच कारणास्तव अमराठी भाषकांना मराठी भाषा शिकवताना आता म्हणी शिकवण्याची आवश्यकता वाटेनाशी झाली आहे.

म्हणी म्हणजे अनुभवांचं सार सांगणाऱ्या चटकदार, अर्थगर्भ अशा तयार उक्ती. एक प्रकारची सुभाषितं. आपल्या बोलण्यात प्रसंगानुरूप अशा तयार उक्तींचा वापर करणं ही एकेकाळची बोलण्यातली लकब होती. ज्या काळात ती प्रचलित होती त्या काळातली लेखनाची भाषाही वैशिष्ट्यपूर्ण असे. बोलण्याच्या भाषेत जसा म्हणींचा तसा लेखनाच्या भाषेत सुभाषितांचा वापर होत असे. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर, आगरकर, टिळक यांचे निबंध पाहिले तर हे लक्षात येईल. त्यांच्या निबंधाची सुरुवातच मुळी सुभाषिताने होई. पुढे विवेचनाच्या ओघातही जागोजागी सुभाषितांची पेरणी ते करीत असत. आपल्या प्रतिपादनाला अनुसरून प्राचीन वाङ्मयात कुठे काही वचन आढळत असेल तर त्या वचनाचा संदर्भ त्यांच्या लेखनात आल्याखेरीज राहात नसे. अवतरणांनी खचाखच भरलेला त्यांचा निबंध कसा भारदस्त वाटत असे !

मागच्या पिढीतल्या भाषाविषयाच्या प्राध्यापकांच्या अध्यापनातही अशी अवतरणांची गर्दी आढळून येत असे. आम्हांला शिकवणाऱ्या इंग्रजी, संस्कृत, मराठी या विषयांच्या प्राध्यापकांमध्ये आपण वाचलेल्या निरनिराळ्या ग्रंथांतील उताऱ्याच्या उतारे वर्गात उद्धृत करण्याची प्रथा होती. पाठ्यपुस्तकात एखादे विधान आले की त्यांना इतर पुस्तकांतली समान वचनं आठवत. ती विद्यार्थ्यांना ऐकवल्याखेरीज त्यांना पुढे जाववतच नसे. विद्यार्थ्यांनाही हे आवडे. प्राध्यापकांच्या स्मरणशक्तीचे, अफाट वाचनाचे त्यांना कौतुक वाटे. कित्येक वेळा हा अवांतर अवतरणांचा हव्यास अतिरेकाला जाई. एका प्राध्यापकांच्या जवळ अवतरणांचा एक तयार संच असे. मग पाठ्यपुस्तकात संदर्भ असो नसो, ती अवतरणे त्यांच्या भाषणातून विद्यार्थ्यांना ऐकवल्याखेरीज ते सोडत नसत. दुसऱ्या प्राध्यापकांना स्वतःच्या स्मरणशक्तीचा अभिमान फार असे. त्यामुळे अशा अवतरणांच्या बाबतीत त्यांचा उत्साह एवढा दांडगा असे की, त्यांचा तास अवतरणातच संपून जाई आणि पाठ्यपुस्तकाचं स्पष्टीकरण तसंच राहून जाई.

आज हे सगळं बदललं आहे. तयार उक्तींचा वापर करण्याची ही शैली सर्वच क्षेत्रांतून नाहीशी होऊ लागली आहे. माझ्या स्वतःच्या किंवा माझ्या पिढीतील इतरांच्या भाषेत म्हणी राहिल्या नाहीत. लेखकांच्या लेखनातही आता सुभाषितांचा हव्यास उरलेला नाही, प्राध्यापकीला सुरुवात केली तेव्हा मी स्वतः आमच्या प्राध्यापकांचं स्मरण करून अवतरणांचा सोस करून पाहिला. पण माझ्या नकळत तो प्रकार केव्हा बंद झाला हे मला कळलंसुद्धा नाही. माझ्याच नव्हे तर इतर नामवंत प्राध्यापकांच्या अध्यापनातसुद्धा मला हल्ली अवतरणं आढळत नाहीत. आज सर्वांचा भर आपला विषय जास्तीत जास्त सोपा करून सांगण्यावर दिसून येतो. अवतरणवेड्या प्राध्यापकांबद्दल आज फारसं आदरानं बोललं जात नाही.

आपण जे जीवन जगतो तेच आपल्या भाषाव्यवहारात प्रतिबिंबित होत असतं. त्यामुळे आपली बदललेली जीवनशैलीच या सर्व परिवर्तनाला कारणीभूत आहे हे उघड आहे. महायुद्धाच्या पूर्वीच्या आपल्या समाजजीवनात फार मोठ्या हालचाली झाल्याच नाहीत. मागच्या पिढीपासून पुढे चालू अशाच प्रकारची आपल्या जीवनाची वाटचाल चालू राहिली. त्यामुळे जुन्या पिढीचे अनुभव पुढच्या पिढीला उपयोगी पडत असत. 'पुढच्यास ठेच मागचा शहाणा' हा लोकन्याय होता. त्यामुळे आप्त वाक्यांना प्रामाण्य दिलं जाई. पिढ्यान् पिढ्या अनुभवांचं स्वरूपही एकसारखंच असे. त्यामुळे जुन्या अनुभवाच्या साच्यात नव्या अनुभवांना बसवणं जमत असे. पण महायुद्धानंतरच्या काळात सर्व जगात परिवर्तनाची एक प्रचंड लाट आलेली आहे. तिने आपली सर्व जीवनशैली झपाट्याने बदलून टाकलेली आहे. मागल्या पिढीपेक्षा आपल्या जीवनाचं स्वरूप फार फार बदललेलं आहे. त्यामुळे जुन्यांचे अनुभव आजच्या संदर्भात पुरेसे वाटणं तर राहू द्याच पण सुसंगतही वाटेनासे झाले आहेत. आजोबांचे शहाणपणाचे बोल आज अपुरे वाटताहेत. त्यांचा आमच्या जीवनातील समस्यांना काही उपयोग होईलसं दिसत नाही. आमच्या समस्यांना सामोरं जाण्याची तयारी आमची आम्हांलाच करावी लागत आहे. त्यामुळे तयार उक्ती, तयार अनुभव, तयार कृती यांचा आज आम्हांला फारसा उपयोग होत नाही. आमच्या भाषाव्यवहारावर याचा अपरिहार्यपणे परिणाम झाला आहे. म्हणी, सुभाषितं, अवतरणं यांच्या स्वरूपातला तयार मसाला आम्ही आज आमच्या भाषाव्यवहारातून बाजूस सारला आहे.

**कल्याण काळे**

# आपल्या भाषेचे पुढे काय होणार ?

कित्यक गोष्टी अशा आहेत की त्याविषयी जितका विचार करावा तितका थोडाच. अशांपैकीच काही गोष्टींकडे आज आपण लक्ष देऊ. पुष्कळ लोकांच्या मनामध्ये वारंवार असे प्रश्न येत असतील की, काय हो, आमच्या या देशाचे पुढे व्हायाचे काय ? आमच्या लोकांचे व्हायाचे काय ? आमच्या धर्माचे व्हायाचे काय ? आमच्या भाषांचे व्हायाचे काय ? आमच्या रीतिभातींचे, आमच्या धंद्यारोजगारांचे, आमच्या कला-कौशल्यांचे, आमच्या बायकामुलांचे, आणि दुसऱ्या अनेक गोष्टींचे पुढे व्हायाचे काय ? प्रश्न दिसतात लहान, पण यांची उत्तरे फार कठीण आहेत. तरी हे प्रश्न फार महत्त्वाचे होत. यांचा विचार प्रत्येक मनुष्याने करण्याला योग्य आहे. तथापि सर्वच विषय एकदम घेऊन त्यांचा निकाल लावण्याचा प्रयत्न करणे सर्वथा अशक्य. म्हणून सोई प्रमाणे एक एक विषय घेऊ. त्या त्या विषयांच्या महत्त्वाप्रमाणे त्यांचा अनुक्रम लावता येईल. आणि त्या अनुक्रमाला लक्षून प्रत्येक विषयाची चर्चा झाली तर तितकी विशेष चांगली गोष्ट होईल हे खरे आहे. तथापि तसा क्रम साधणे फारच कठीण, म्हणून जसजशी अनुकूलता होईल, तसतसा एक एक विषय म्हणजे पूर्वोक्त प्रश्नांपैकी एकेक प्रश्न घेऊन त्याची चर्चा करण्याचा प्रयत्न करू. आजरोजी जो प्रश्न घ्यावयाचा तो हा, – " आमच्या भाषेचे पुढे व्हायाचे काय ? "

या प्रश्नाचा विचार करण्यापूर्वी, आधी त्यामध्ये काय काय गोष्टींचा समावेश होतो हे पाहिले पाहिजे. आमच्या मते या प्रश्नामध्ये इतक्या गोष्टी येतात. ( १ ) आमच्या भाषा म्हणजे काय ? ( २ ) त्यांची सध्याची स्थिती कशी आहे ? ( ३ ) त्याकडे आम्ही दुर्लक्ष केल्याने काय परिणाम होण्याचा संभव आहे ? आणि ( ४ ) त्यांच्या संबंधाने आपले प्रत्येकाचे कर्तव्य काय आहे ? इतक्या गोष्टींचा विचार झाला, म्हणजे मुख्य प्रश्नांचे उत्तर सहज निघण्याजोगे होईल.

( १ ) वस्तुतः आमच्या भाषा म्हणजे भरत खंडातील सर्व भाषा असा अर्थ निष्पन्न होतो. तथापि तितका विस्तृत अर्थ आज आम्ही घेत नाही. तर इतकाच घेतो की आमची महाराष्ट्र देशाची जी शुद्ध मराठी भाषा ती, आणि 'मराठी भाषेच्या पोटभाषा' हे नाव ज्या भाषांना लाविता येईल, अशा कोकणी, गोमंतकी, खानदेशी, वऱ्हाडी इत्यादी ज्या शुद्धाशुद्ध भाषा, त्या आमच्या भाषा असा येथे अर्थ घेतला आहे. इतक्यांच्या संबंधानेच जर यथातथ विचार झाला, तर तोच काही थोड्याशा

फेरफाराने महाराष्ट्राच्या बाहेरच्या भाषांनाही लाविता येईल. अथवा ज्यांना तो विषय फार निकट संबंधाचा असेल, ते लोक त्याकडे लक्ष देतील.

( २ ) आमच्या भाषांची सांप्रतची स्थिती कशी काय आहे ? आपली जी खुद्द म्हणजे शुद्ध मराठी भाषा, तिची स्थिती पाहिली, तर सांप्रत पुष्कळ गोष्टींनी फार चांगली आहे, असे म्हणण्याला काही अडचण दिसत नाही. कारण, तिचे शुद्ध स्वरूप म्हणजे अमुक, असे आज पुष्कळ वर्षांपासून ठरून गेले आहे, ही मोठी गोष्ट. तिजमध्ये बहुतेक विषयांवर लहान मोठे ग्रंथ बरेच झाले आहेत, व दिवसेंदिवस अधिकाधिक होत आहेत. तिजमध्ये वर्तमानपत्रे, आणि नियतकालिक पुस्तकेही बरीच निघत आहेत. तिजमध्ये ज्या ज्या गोष्टींचे साहित्य उणे आहे, ते ते भरून काढण्या-विषयी विद्वान लोक बराच प्रयत्न करीत आहेत. विश्वविद्यालयामधून त्या भाषेला बाहेर लावून दिले असल्यामुळे तिच्या प्रसाराला मोठेंच विघ्न आले ही गोष्ट खरी, तथापि लौकरच तिचा त्या विद्यामंदिरात पुनः प्रवेश होण्याचा संभव दिसत आहे ही आनंदाची गोष्ट होय.

मराठी भाषेच्या ज्या पोटभाषा आहेत, त्यांची स्थिती पाहिली तर ती मात्र चांगली नाही असे म्हणणे प्राप्त होईल; खुद्द मराठीमध्येच जे अशुद्ध प्रकार आहेत, त्यांनाही तूर्त या पोटभाषांमध्ये गृहीत करण्यास काही बाध दिसत नाही. या सर्व भाषांमध्ये सर्वमान्य किंवा शुद्ध प्रकार म्हणजे अमुक असे मुळीच म्हणता येत नाही. ज्या त्या प्रांतातील किंबहुना ज्या त्या गावातील लोक आपआपली पोटभाषा तीच शुद्ध, तीच प्रौढ, तीच सर्वमान्य, असा आग्रह धरून केव्हा केव्हा भांडतात, परंतु त्या आग्रहात काही अर्थ आहे असे म्हणवत नाही. कारण की पोकळ भांडणा-खेरीज त्या त्या भाषेचा कोणत्याही उपयुक्त गोष्टीमध्ये ते अभिमान बाळगतात असे म्हणता येत नाही. त्या भाषा केवळ बोलण्याच्या कामापुरत्याच. कागदावर कधी त्या भाषेतला शब्द पडत नाही, तेव्हा पुस्तकाचे नाव ते कशाला ? केवळ कौतुकार्थ, किंवा थट्टेसाठी, किंवा नमुन्यासाठी क्वचित् कोणी पाच चार ओळी लिहिल्या असल्या तर ! त्या पलीकडे काही नाही. या भाषा बोलणाऱ्या लोकांचा सर्व पत्रव्यवहार पाहिला तर भिन्न भाषेच्या द्वारे. मराठी देशामध्ये मराठीने, कानडी व मलबार देशामध्ये त्या त्या भाषेने होतो. त्यांना स्वतंत्र भाषा हे नाव देणे फार कठीण आहे, व दिवसेंदिवस त्यांचे असले नसले स्वातंत्र्य तेही जात चालले आहे.

( ३ ) आता तिसरी गोष्ट. आमच्या भाषांकडे आम्ही दुर्लक्ष केल्याने काय परिणाम होणार आहे ? प्रथमतः मुख्य मराठी भाषेविषयी. मराठी भाषेची स्थिती पुष्कळ चांगली आहे असे वर म्हटले आहे, तथापि तो तिच्या स्थितीचा चांगुलपणा उणा न होता, दिवसेंदिवस जर वाढत चालला तर तिची स्थिती नीट राहील. नाही तर एकदा जर का तिचे पाऊल मागे हटले तर सध्याच्या वाढत्या इंग्रजी भाषेपुढे तिचे

काही चालणार नाही. मग ती मागे पडलीच ! पोटभाषा तर असून नसल्यासारख्याच आहेत. त्यांच्यामुळे मुख्य मराठी भाषेच्या शुद्धतेला मात्र बट्टा लागत आहे, इतकाच त्यापासून लाभ ! दुसरे काही नाही. या पोटभाषांची अशी ही दीन स्थिती फार शोचनीय आहे यात संशय नाही. म्हणून या भाषांकडे जर सध्या लक्ष न दिले, तर दिवसेंदिवस त्यांची स्थिती अधिकाधिक विघडत जाणार आणि तसल्या अव्यवस्थित भाषांच्या संसर्गामुळे शुद्ध मराठी भाषेलाही त्या त्या प्रमाणाने त्रास होत जाणार असे उघड दिसते.

(४) आता शेवटचा प्रश्न 'त्या भाषांच्या संबंधाने आपले प्रत्येकाचे कर्तव्य काय ?' शुद्ध मराठीच्या संबंधाने आमचे मत असे आहे की, जर मराठी भाषेची विशेष सुधारणा झाली पाहिजे, तर त्या सुधारणेचा पहिला मार्ग हा– आपले लौकिक, धार्मिक, राजकीय, यांत्रिक, व्यावहारिक तसेच अर्वाचीन नानाविध शास्त्रसंबंधी जे अनेक विषय, त्यांची पुस्तके, व्याख्याने, निबंध, आणि ओतप्रोत चर्चा ही शुद्ध मराठी भाषेने करण्याचा उद्योग दिवसेंदिवस आपण वाढविला पाहिजे.

असा एक प्रश्न वारंवार निघत असतो की पुस्तके करावी, अमुक लिहावे, तमुक लिहावे, पण वाचतो कोण ? हा प्रश्न खरा आहे, पण त्याचे उत्तर सोपे आहे.

कित्येक पुस्तके किंवा लेख असे असतात की, त्यांना कोणी विचारीतही नाही, किंवा त्याकडे कोणी ढुंकूनही पाहत नाही. परंतु कित्येक असे असतात की, ज्याला पुस्तक वाचण्याची बिलकूल हौस नाही, तशाही मनुष्याच्या कानी त्याचा काही थोडासा भाग पडला, तर त्याला ते संपूर्ण वाचण्याची पराकाष्ठेची इच्छा होते. याचे कारण काय ? तर विषयाची गोडी, आणि त्यात पुनः लिहिण्याचेही चातुर्य. "प्रयोजनमनुद्दिश्य मंदोऽपि न प्रवर्तते." कोणतीही गोष्ट मनुष्याच्या अंतःकरणाला जाऊन झोंबल्यावाचून तिजकडे त्याचे पूर्ण लक्ष लागायाचे नाही. आणि ती तशी झोंबली, म्हणजे आपोआप तिजकडे तो लक्ष देऊ लागतो. ज्या लेखापासून काही उपयोग नाही, किंवा काही नवीन प्राप्त होत नाही, त्याकडे कोणीही लक्ष देत नाही. याकरिता प्रत्येक लेखकर्त्याने ही गोष्ट ध्यानात ठेविली पाहिजे, की ज्यापासून काही तरी नवीन कल्पना, किंवा जुन्या कल्पनांनाच नवे स्वरूप उत्पन्न होईल, असे चणचणीत लेख असल्यावाचून त्यांच्या लेखाला कोणीही विचारणार नाही. शिळे किती दिवस चालेल ? इंग्रजी वगैरे भाषांमध्ये ज्यांना नवे नवे काही तरी प्रतिदिनी मिळते त्यांना शिळ्या मराठी लेखांची गोडी कशी लागावी ? यासाठी, जुन्या शिळ्या कल्पना, आणि जुन्या शिळ्या गोष्टी, जशांच्या तशा पुढे न आणता, नव्या नव्या कल्पना, किंवा निदान पक्षी जुन्या शिळ्या कल्पनांनाच ताजी चणचणीत फोडणी देऊन जर त्या ताज्या केल्या तर त्यांची गोडी ग्राहकांना सहज लागेल. पण ही गोष्टही लक्षात ठेवली पाहिजे की कल्पना नवीन असोत किंवा जुन्या असोत, त्यांचा

उपयोग काय हे स्पष्ट असले पाहिजे. नाही तर त्यापासून इष्ट हेतू कधीही साध्य होणार नाही. आता हीच गोष्ट का ध्याना, की " मराठी भाषेचा आणि मराठी ग्रंथाचा उपयोग काय? हा इतका खटाटोप पाहिजे आहे कशाला? आहे इंग्रजी भाषा आयती, ती घ्यावी, तिजमध्ये पुस्तके आहेत, लेख आहेत, सर्व काही आहे. " हे वाक्य केवळ काल्पनिक असे नाही. पुष्कळ लोकांची अशीच समजूत आहे. काही दिवसांमागे एका विद्वान गृहस्थाने या मुंबईतील एका प्रसिद्ध सभेमध्ये व्याख्यान दिले होते, की देशी भाषांचा कांही उपयोग नाही, त्यांच्या जागी इंग्रजी भाषाच सर्वत्र चालू होईल तर बरे, इत्यादी. परंतु आमचे म्हणणे तर असे आहे की ज्या देशातील लोकांना स्वतःचे घरदार नाही, पण स्वतःची भाषाही नाही, त्यांचे जिणे व्यर्थ होय! ज्यांची देशभाषा गेली, त्यांच्या हातून काही मोठे कृत्य व्हायाचे नाही. अलीकडे मुंबईतील कित्येक पारशी गृहस्थांनी, गेल्या संपूर्ण दहा शतकांमध्ये आपली म्हणून अंगीकारिलेली जी गुजराथी भाषा, ती सोडून देऊन सर्वत्र घरी-दारी इंग्रजी भाषाच चालू करावी असा निश्चय केला आहे असे समजते. परंतु ही गोष्ट सर्व प्रकारे दुश्चिन्हसूचक होय, असे म्हटल्यावाचून आमच्याने राहवत नाही. आम्ही तर असे समजतो, की ज्यांनी देशाची भाषा सोडली, त्यांचा त्या देशाच्या संबंधाचा सर्व अभिमान गेला, ते त्या देशाला परके झाले, त्यांच्या हातून त्या देशाच्या कल्याणाची काही मोठी गोष्ट होणार नाही. त्यांची दृष्टी बहिरंग झाली, बाहेरच्या देशाकडे लागली, ते देशातून दूर जातील तर वाईट नाही. आमच्या देशामध्ये जे क्रिश्चन लोक आहेत त्यांचीही भाषेच्या संबंधाने मोठी शोचनीय स्थिती झाली आहे बहुतेक क्रिश्चन लोकांना, आणि त्यात विशेषे करून रोमन क्याथोलिक मताच्या क्रिश्चन लोकांना देशी भाषांचे ज्ञान तांत्रिकच असल्यामुळे, त्यांनी पोर्तुगीज किंवा इंग्लिश भाषा आपली करण्याचा प्रयत्न चालविला आहे. परंतु त्यांचीही स्थिती हीच. त्यांना या देशाचा किंवा लोकांचा अभिमान जर काही थोडासा असेल, तर तो या कृत्यांमुळे दिवसेंदिवस नाहीसा होत जाणार; त्यांच्याही हातून या देशाच्या खऱ्या कल्याणाची गोष्ट काही होणार नाही. ते आपण होऊन आपणांला इतक्यातच परके मानू लागले आहेत. ज्यांच्या पन्नास पिढ्यांमध्ये परदेशीय रक्ताचा लेशही खरोखरी नसेल, आणि या गोष्टीमुळे ज्यांना, आपण इथले पूर्ण देशी लोक म्हणविण्याचा मोठा अभिमान वाटावा त्यांना त्या 'देशी लोक' या शब्दाची लाज वाटू लागली आहे; आणि कोणी म्हणतो, मी पोर्तुगीस, कोणी म्हणतो मी इंग्रज! तेव्हा अशा मनुष्यांला या देशाचा आणि या देशातील लोकांचा कितीसा अभिमान उत्पन्न होणार हे उघड दिसत आहे. देशातील सर्व लोक एका वळणात राहण्याला भाषा हे एक मोठे साधन आहे. ते जर नाही, तर तितके त्यात न्यून पडले. भाषाभेदापासून मतभेद होतो, आणि मतभेदापासून द्वेषभाव उत्पन्न होण्याला सहाय्य होते, इत्यादी अनेक कारणां-

वरून पाहता, देशभाषा जी आहे तिचा अभ्यास आणि तिची सुधारणा, आणि व्यवहारामध्ये तिचा होईल तितका उपयोग करण्याविषयी प्रत्येकाने झटले पाहिजे. इंग्रजी वगैरे फार उपयोगी ज्या परभाषा आहेत त्यांचा अभ्यास करणे हेही फार अवश्य आहे खरे, तथापि यावरून देशी भाषेच्या अभ्यासाचे महत्त्व उणे होते असे नाही. कोणताही विचार, कोणतीही सुधारणा, जर देशातील लहान-थोर सर्व स्त्री–पुरुषांना समजली पाहिजे, जर त्याविषयी प्रत्येक व्यक्तीने उद्योग करण्याला झटले पाहिजे, तर देशभाषेसारखे त्या कृत्याच्या उत्तेजनाला दुसरे साधनच नाही. परभाषा तुम्ही कितीही चांगल्या शिका, तथापि त्यांपासून, हा जो आबालवृद्धांच्या अंतः-करणावर होणारा इष्ट परिणाम, तो कधीही साध्य होऊ शकणार नाही. यावरून परभाषांचा आम्ही तिरस्कार करितो असे बिलकूल कोणी समजू नये. त्यांच्या अभ्यासांची योग्यता जी आहे ती आहेच; ती कमी होत नाही. तथापि परभाषांची योग्यता कितीही मोठी असली, तरी स्वदेशभाषेच्या अभ्यासाचे महत्त्व तेणेकरून लेशमात्रही कमी होत नाही, इतकेच आमचे म्हणणे आहे. तरी पुनः म्हणतो, की जर स्वदेशभाषा आणि परभाषा, यामध्येच निवड करण्याचा प्रसंग आला, तर आधी स्वदेशभाषा आणि मग परभाषा, हेच आमचे तत्त्व आहे. कारण की ज्यांची देशभाषा मोडली, त्यांचे हातपाय मोडले, त्यांची तोंडे बंद झाली. यापेक्षा आणखी वाईट परिणाम तो कोणता ? सर्व वाईट परिणाम यांत आले. तेव्हा देशभाषेच्या त्यागाचा जर हा सर्वथा अनिष्ट परिणाम, तर उलट पक्षी त्याच देशभाषेच्या अभ्यासाचा काय उपयोग, हे पुनः पुनः विचार करून सांगण्याचे कारण राहात नाही. तेव्हा स्वदेश-भाषेच्या संबंधाने प्रत्येकाचे कर्तव्यकर्म म्हटले म्हणजे, हे आहे की जितकी ती भाषा शुद्ध ठेवण्याचा प्रयत्न करवेल तितका अवश्य केला पाहिजे. ज्यांच्या व्यवहारामध्ये तिचे कोणत्याही प्रकारे अशुद्ध रूप येत असेल त्यांनी ते नीट लक्षात आणून, त्याच्या जागी शुद्ध रूप योजण्याचा झटून प्रयत्न केला पाहिजे. सांप्रत मुंबईमध्ये एका मोठ्या सभेमध्ये असा एक फार उत्तम नियम केलेला आहे, की त्या सभेच्या कोणीही सभासदाने मिश्रित भाषा बोलू नये म्हणजे अर्धे मराठी आणि अर्धे इंग्रजी असे करू नये. निदानपक्षी एकाच वाक्यामध्ये तरी दोन भाषांतील शब्द मिश्रित करू नयेत. हा फार उपयोगी नियम जर सर्व लोक स्वीकारतील, तर फार उत्तम परिणाम होईल, यात काही संशय नाही. याशिवाय, मराठी भाषेच्या संबंधे मुख्य कृत्य म्हटले म्हणजे इतकेच, की प्रत्येकाने आपणाकडून होईल तितका तिचा अभ्यास चालू ठेवावा. आपले अनेक विचार शुद्ध मराठी भाषेने बोलून दाखविण्याचा आणि लिहून ठेवण्याचा अभ्यास ठेवावा. ऐतिहासिक गोष्टी, सृष्टिज्ञानासंबंधी विचार, देशस्थिती, लोकस्थिती, इत्यादी अनेक विषयांना अनुलक्षून प्रसंगोपात्त भाषण करावे, लेख लिहावे, ऐकावे, आपण लिहिलेले व इतरांनी लिहिलेले वाचावे; आणि आपल्या

सामर्थ्याप्रमाणे अशा गोष्टींना उत्तेजन द्यावे. यामध्ये सर्व आले. इतके जर प्रत्येक मनुष्याने लक्षात ठेविले तर पुष्कळ झाले ?

आता मराठी भाषेच्या आसपास ज्या पोटभाषा आहेत, त्यांच्या संबंधाने काही लिहिणे अवश्य आहे. त्या भाषांची स्थिती फार वाईट आहे, असे वर म्हटलेच आहे. परंतु त्या भाषांची स्थिती सुधारण्याला आता करावे काय, हा प्रश्न येऊन उभा राहिला. असे जर म्हटले, की शुद्ध मराठी भाषेचा अभिमान धरून तिची सुधारणा करण्याचा जो उपाय वर सांगितला आहे, तोच उपाय त्या भाषांच्या संबंधाने चालविला, तर काय अडचण येईल ? बरे, पाहू तर खरे. तोच उपाय करायाचा म्हटले म्हणजे, काय काय करे केले पाहिजे ? तर प्रथमतः प्रत्येक भाषेचे एकेक व्याकरण, एकेक कोश, आणि बरीच वाचनपुस्तके, इतके आधी तयार केले पाहिजे.

शाळांमध्ये ती शिकवली पाहिजेत; इतिहासादी अनेक विषयांचे ग्रंथ केले पाहिजेत; वर्तमानपत्रे वगैरे सर्व प्रकार त्या त्या भाषेत झाला पाहिजे. परंतु हे सर्व होऊ शकणारे आहे काय ? प्रांतोप्रांती, किंबहुना गावोगावी अशा भाषा वेगळ्या वेगळ्या आहेत. त्यात पुनः ब्राह्मणादी जातींच्या वेगळ्या, शूद्रादी जातींच्या वेगळ्या. तेव्हा अशा निरनिराळ्या भाषा देशांमध्ये किती करायाच्या ? परंतु असेही कोणी म्हणू शकेल की कितीही होतना, त्याचे काय ? ज्याला त्याला आपापल्या भाषेचा अभिमान नको का ? पण हीही गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे की आपापल्या भाषेचा अभिमान जर पूर्वीपासून सर्वांनी ठेविला असता, तर इतक्या वेगवेगळ्या भाषा झाल्याच नसत्या. अभिमान सुटल्यामुळेच ही स्थिती झाली आहे. परंतु असा पूर्वपक्ष होईल की, गेली ती गोष्ट गेली, पण इतःपर आम्ही आमच्या भाषांचा अभिमान धरू. आम्ही म्हणू, फार उत्तम गोष्ट आहे, पण जर असे करू शकाल तर. आम्ही तर खात्रीने सांगू शकतो, की ही गोष्ट अशक्य आहे. का अशक्य ? तर प्रथमतः ही व्यवस्था उत्पन्न करण्याला आणि निरंतर चालू ठेवण्याला द्रव्याचा किती भयंकर व्यय करावा लागेल, हे पाहिले पाहिजे. इतके द्रव्य कोणीही मातबर मनुष्य या कृत्याला लागेल तितका पैसा द्यायला उभा राहिला तरी त्याच्यानेही हे कृत्य तडीस नेववणार नाही, आणि कदाचित् सिद्धीस नेले, तरी असे म्हणणे प्राप्त आहे की ते केवळ वेडेपणाचे काम होईल. यासाठी ते द्रव्य याहून चांगल्या अशा दुसऱ्या एखाद्या कृत्याला खर्चावे हे चांगले. कारण की, या कृत्यापासून पैशाचा पैसा फुकट जाऊन, काही लाभ न होता, हानी मात्र मोठी होईल. क्षणभर असे समजू की गावोगाव वेगवेगळ्या भाषा कायम झाल्या, त्यांची वेगवेगळी पुस्तके सिद्ध झाली. परंतु असल्या संकुचित भाषांपासून केवढा मोठा तोटा होणार आहे तो पाहिला पाहिजे. मराठीसारख्या स्थायिक झालेल्या प्रौढ भाषेमध्ये जे आज विद्येचे भांडार वाढत चालले आहे, ते या लोकांना सर्वथा निरुपयोगी होईल. ते प्राप्त करून घ्यायाचे असेल तर मराठीचा अभ्यास वेगळा

केलाच पाहिजे. या गावचे वर्तमानपत्र त्या गावी व त्या गावचे या गावी कोणाला समजायाचे नाही. अर्थात् ते निरुपयोगी. एका गावच्या लोकांनी दुसऱ्या गावच्या लोकांस पत्र पाठवायाचे तर प्रश्न एका भाषेत आणि उत्तर दुसऱ्या भाषेत असे झालेच पाहिजे. कारण अभिमानाची गोष्ट पडली. वीस वर्षांमागे युरोपखंडामध्ये फ्रान्स आणि जर्मनी या दोन राज्यांमध्ये जेव्हा मोठा युद्धसंग्राम होऊन फ्रान्सचा मोड झाला, तेव्हा जर्मनी देशाच्या बादशहाने आपल्या जयाचे आनंदकारक वर्तमान रशिया देशाच्या बादशहाला लिहून कळविले. युरोपखंडामध्ये निरनिराळ्या राज्यांचा परस्पर पत्रव्यवहार पूर्वीपासून फ्रेंच भाषेने चालत आलेला आहे. परंतु जर्मन लोकांना असा गर्व झाला की. ज्यापक्षी आपण फ्रेंचांचा पराभव केला, त्यापक्षी त्यांची भाषा आता आपल्याला कशाला? आमचीच भाषा आम्ही चोहोकडे चालवू. अशा अभिमानाने त्यांनी आपले पत्र जर्मन भाषेने लिहून पाठविले. परंतु जे उत्तर आले ते पाहतात तो फ्रेंच भाषेतही नाही, आणि जर्मन भाषेतही नाही, तर रशियन भाषेत! तेव्हा राव शुद्धीवर आले, आणि दुसरे पत्र पाठविताना पूर्ववत् फ्रेंच भाषेचा त्यांनी आश्रय केला. तेव्हा सर्व गोष्टी पूर्ववत् ठीक चालू झाल्या. अभिमानाची गोष्ट म्हटली म्हणजे तेथे असाच परिणाम व्हायाचा. मराठी लोकांना जर कोकणी लोकांनी किंवा गोमंतकी लोकांनी पत्र पाठवायाचे तर सध्याप्रमाणे मराठी भाषेचे पत्र लिहिले असता कमीपणा घेतल्यासारखे होणार, स्वतःच्या भाषेने पत्र लिहावे, तर ते वाचण्याची खटपट करतो कोण? तेव्हा असा वेडा अभिमान कामाचा नाही. शुद्ध मराठीचा आश्रय केल्यावांचून कांही चांगला परिणाम व्हायाचा नाही. पण असे जर करावे तर अभिमान राहिला कोठे? आणि मराठी भाषेच्या संबंधाने लिहिताना जी इतकी देशाभिमानाची तरफ ताणली आहे तिचा काय उपयोग? पण असे नव्हे. मराठीच्या संबंधाने जे काही लिहिले आहे ते योग्य आहे. परंतु ती गोष्ट येथे लागू होत नाही. ते कसे म्हणाल तर पाहा. मराठीचा आणि परभाषांचा जो परस्पर संबंध आहे तो वेगळा. आणि तिचा आणि तिच्या पोटभाषांचा जो संबंध आहे तो वेगळा. या पोटभाषा जरी मराठीहून एका प्रकारे भिन्न आहेत, तथापि त्यांपैकी बहुतेक मराठीपासूनच अपभ्रंशरूपाने उत्पन्न झाल्या आहेत, किंवा फारच भेद म्हटला तर मराठीचे मूळ आणि त्यांतील कित्येकींचे मूळ तरी एकच आहे. यामुळे त्यांच्यामध्ये आणि मराठीमध्ये फार मोठासा भेद नाही. काही विशेष शब्द आणि काही विभक्तिरूपे शिवाय करून पाहिले असता, एकंदर भाषाशैलीच्या किंवा शब्दसंग्रहाच्या दृष्टीने फारसा भेद नाही. लिंग भेदादिकांमध्ये सुद्धा फार सादृश्य आहे. बोलण्याचा तो झोक किंवा सूर त्यामध्ये मात्र बरेच अंतर पडते. अशा कारणांवरून पाहता, मराठीला सोडून स्वतंत्र रूपाने राहण्याची त्यांच्या अंगी योग्यताही नाही, आणि त्यांना ती गोष्ट शोभणारही नाही. सध्या कागदोपत्री तर त्यांच्याऐवजी मराठी भाषा घेतलीच आहे. तेव्हा आमचे





अनुक्रमणिका

म्हणणे इतकेच की, अपभ्रंशरूपाने असोत किंवा कोणत्याही कारणाने असोत मराठीच्या पोटभाषा म्हणून जितक्या आहेत, त्यातील कोणतीही भाषा बोलणाऱ्या प्रत्येक मनुष्याने ही गोष्ट पूर्णपणे ध्यानात ठेविली पाहिजे की मराठी भाषेपासून आपली भाषा वेगळी नाही, वेगळेपणा फारफार मानिला तरी एका पिढीच्या आतला आहे. त्यापक्षी त्यांची सुधारणा करणे व त्यांचा अभिमान धरणे म्हणजे इतकेच की त्या भाषांमध्ये आणि मराठीमध्ये जो जो म्हणून भेद दृष्टीस पडतो, तो तो सोडून देऊन त्या भाषांनाच शुद्ध मराठीचे स्वरूप द्यावे. कोणी म्हणेल की त्या भाषा निखालस टाकून देऊन मराठी भाषाच घ्या असे स्पष्ट का नाही म्हणत ? संकोचित भाषण का करिता ? तर हे म्हणणे योग्य नाही. कारण या पोटभाषा जर मराठीहून अगदी भिन्न असत्या, तर तेथे, त्या टाका आणि ही नवी म्हणजे मराठी भाषा घ्या, हे म्हणणे शोभते. परंतु जर त्या वेगळ्या नाहीतच, तर त्या टाका, आणि ही घ्या हे म्हणणे लागतच नाही. आणि जरी त्या वेगळ्या मानिल्या तरी त्या टाका असे म्हणण्याचे आता कारणच राहिलेले नाही; कागदोपत्री व पुस्तकादी लेखांमध्ये त्यांचा कधीही आदर झालेला नाही; त्यांना मुळीच सोडून देऊन तुम्ही मराठीचे कधीच ग्रहण केले आहे. तेव्हा त्यांचा वेगळेपणा तो राहिला आहे कोठे ? यास्तव पोकळ आग्रहास न पडता जसे लेखांमध्ये मराठीचे निर्विवाद ग्रहण केले आहे तसे बोलण्यामध्येही शुद्ध मराठी भाषा योजण्याचा सर्व महाराष्ट्र जनांनी, म्हणजे सध्या मराठीच्या पोटभाषा बोलणारां-नीही निश्चय करावा, आणि त्याप्रमाणे चालण्याची रीत एकदम सुरू करावी. हीच त्या पोटभाषांची सुधारणा. दुसरा मार्ग नाही. त्या अशुद्ध भाषा मानल्या जातात, इतकेच नव्हे, पण त्या आंगळ अप्रतिष्ठित मानल्या जातात. यामुळे त्या बोलणारांना चारचौघांमध्ये मान खाली घालावी लागते. स्वतःच्या घरी जरी असे न घडले तरी आपापल्या ठिकाणाबाहेर ते गेले, म्हणजे अभ्यास नसल्यामुळे त्यांना शुद्ध बोलता येत नाही, आणि मग फटफजितीला पारावार नाहीसा होतो. यास्तव मराठीवाचून गत्यंतर नाही, आणि जर गत्यंतर नाही, तर एकदम तिचा स्वीकार करण्यासारखे दुसरे शहाणपण नाही. शुद्ध भाषा बोलता येणे हा सभ्य मनुष्याचा एक अलंकार आहे, आणि सुशिक्षितपणाचे एक अंग आहे. आणि याच्या उलट जी स्थिती ती निःसंशय लांच्छनास्पद आहे, ही गोष्ट प्रत्येक मनुष्याने ध्यानांत ठेविली पाहिजे. अभिमानादी सर्व गोष्टींचा पूर्वीच निकाल केला आहे. सारांश शुद्ध मराठीचा खरा अभिमान धरणे हाच पोटभाषांचा अभिमान होय, दुसरा नाही.

ही सर्व गोष्ट मान्य केली, तरी एक अडचण राहाते. ती कोणती ? तर त्यांना शुद्ध मराठी भाषा बोलता येत नाही, मुळीच मराठी बोलण्याचा अभ्यास नाही, आणि आसपास शुद्ध बोलणारेही कोणी सापडत नाहीत, तर त्यांनी कसे करावे ?– या प्रश्नावरून इतके तरी म्हणता येते की त्यांना शुद्ध भाषा शिकण्याची इच्छा आहे,





अनुक्रमणिका

असे गृहीत करण्यास बाध नाही. म्हणून त्यांना इतकेच सांगणे योग्य आहे, की परकी लोकांना जरी मराठी भाषा कठीण वाटण्यासारखी कदाचित् असली, तरी या पोटभाषा ज्याची जन्मभाषा आहे, त्याला शुद्ध मराठी भाषा शिकणे फार अवघड नाही. इतकेच की त्याने श्रम घेऊन थोडासा अभ्यास केला पाहिजे. मराठी पुस्तके आता पुष्कळ झाली आहेत, ती वाचण्याचा थोडाथोडा त्याने परिपाठ ठेवावा, म्हणजे सहजच त्याची त्यामध्ये गती होत जाईल. आमची इच्छा अशी आहे की या कामी आम्हांकडून होईल तितके आम्ही साहाय्य करावे. म्हणून सर्व विद्वान् लोकांस आमची विनंती आहे की, ज्या ज्या प्रांती मराठी भाषेमध्ये जे जे अशुद्ध प्रकार आढळतील ते ते त्यांनी कृपा करून आम्हांस कळवावे. म्हणजे ते प्रकार आणि त्या संबंधी आमची स्वतःची माहितीही जी असेल ती आम्ही मोठ्या आनंदाने प्रसिद्ध करू. ज्यांना लिहिता येत नाही त्यांना, ज्यांना येते त्यांनी जर मदत केली, तर क्रमशः सर्व गोष्टी सिद्धीस जातील. अगदी निरक्षर आणि अशिक्षित लोकांमध्ये या गोष्टींचा एकाएकी प्रसार होणे अमळ कठीण आहे असे प्रथमः वाटते खरे. परंतु केवळ शुद्ध भाषा ऐकल्यानेही केव्हा केव्हा अशुद्ध भाषा शुद्ध होण्याच्या मार्गाला लागते. पण इतके कशाला ? ज्यांना लिहिता वाचता येते, त्यांच्या पुरतीच जरी आज ही सुधारणा झाली, तरी ते मोठेच काम झाले असे म्हटले पाहिजे. हळूहळू पुढे क्रम सुरू ठेवल्याने सर्व नीट होत जाईल.

कित्येक वृद्ध लोकांनाही शुद्ध भाषा शिकण्याची फार हौस असते, आणि तेही मोठ्या अगत्याने शिकतात. शिकविणारा कोणी मिळत नसला तर मात्र त्यांचा उपाय चालत नाही. परंतु जर कदाचित् वृद्धांना, आणि कित्येक तरुणांनाही हा उद्योग आवडला नाही, तर त्यात काय झाले ? ज्यांना ज्यांना इच्छा आहे त्यांनी तो स्वत: अभ्यास करावा, आणि इतरांनाही त्यापासून होणारे फायदे दाखवून द्यावे. जे ऐकतील ते ऐकोत. ज्यांना ती गोष्ट आवडेल ते ती घेतील. इतर नाही घेणार; इतकेच; दुसरे काय ? पण एकपक्षी वृद्धलोकांना या कामी तर तसदी देण्याचे प्रयोजनच नाही; कारण आपोआप मागे पडत जाणारे ते लोक. म्हणून त्यांच्या ठायी इच्छा आहे असे दृष्टीस पडेल, तेव्हा अवश्य त्यांना त्या कामी मदत करावी. परंतु जेथे इच्छेचा अभाव किंवा कंटाळा दिसेल, तेथे आग्रह चालविण्याच्या भरीस पडणे अयोग्य होय. नवीन संततीला मात्र मुळापासून शुद्धच भाषा शिकविण्याचा प्रघात होईल तितका अगत्याने ठेवावा. एकदा तो चालू झाला म्हणजे मग त्यामध्ये काही अडचण येणार नाही. याकामी बायकामंडळीचे मोठे साहाय्य पाहिजे आहे. त्यांना आपण शुद्धच भाषा बोलावी अशी नैसर्गिक इच्छा असते. नवीन नवीन सुंदर सुंदर पोषाखांची आणि नवीन नवीन चांगल्या चांगल्या दागिन्यांची जशी त्यांना मोठी हौस, तशीच आपणास चांगली शुद्ध भाषा बोलता यावी अशी त्यांना फार हौस

असते. परंतु स्त्रिया म्हटल्या म्हणजे स्वभावतः अंमळ लज्जाशील, म्हणून त्यांना हा नवीन प्रकार घेण्याला पुरुषांनीच आरंभी उत्तेजन देऊन, अडल्या प्रसंगी होईल तितके साहाय्य केले पाहिजे. एकदा तो संकोचरूपी अडथळा दूर झाला म्हणजे मग पुढे काही अडचण येणार नाही. आणि भाषा शिकण्याच्या कामी पुरुषांपेक्षा स्त्रियांच्या अंगी अधिक सामर्थ्य आहे असे सहज दृष्टीस पडेल.

कित्येकांची अशी एक अडचण असते, की ते म्हणतात आम्हांला मुळापासून आपल्या मंडळीमध्ये आमच्या जन्मभाषेहून वेगळी भाषा बोलण्याचा अभ्यास नसल्यामुळे तशा मंडळींमध्ये मराठी भाषा बोलण्याला मोठा संकोच वाटतो. इतकेच नव्हे, तर तो नवा प्रकार केवळ थट्टेसारखा वाटतो, आणि मनमोकळे पोटभर त्या भाषेने बोलण्याला उल्हास येत नाही, कसेसेच वाटते, आणि मनाचे समाधान होत नाही, त्याला काय करावे ? पण कोणतीही नवी रीत चालू केली म्हणजे प्रथमतः तसे वाटावयाचेच. इंग्रजी भाषा शिकणारांना ही गोष्ट माहीत आहे की आरंभी काही दिवस पर्यंत त्या भाषेने बोलण्याला फार शरम वाटते. चुका झाल्याबद्दल किंवा नवा प्रकार घेतल्याबद्दल कित्येक लोक थट्टाही करितात. परंतु हे सर्व आठ पंधरा दिवस किंवा फार तर महिना दोन महिने चालते. पुढे मग काही नाही. तोच प्रकार येथे व्हायाचा. आपापसामध्ये इंग्रजी सारख्या अगदी भिन्नभाषेने जर आम्ही निःशंकपणे बोलतो, तर शुद्ध मराठीने बोलण्यालाच आम्हांला संकोच वाटावा, आणि त्या संकोचाला भिऊन आम्ही तो उद्योग सोडून द्यावा, हीच मोठी लज्जेची आणि नादानपणाची गोष्ट आहे. सारांश, असल्या पोरकट शंकांमध्ये काही अर्थ नाही हेच सत्य.

आणखी असा एक प्रश्न आहे की कानडा जिल्ह्यामध्ये आणि पलीकडे दक्षिणेस समुद्रतीरी कोचीनप्रांती जे कोकणी भाषा बोलणारे सहस्रावधी लोक राहात आहेत त्यांनी काय करावे ? त्यांच्या देशी मराठी भाषा नाही. देशभाषा म्हटली म्हणजे कानडी, मल्याळी, किंवा मलबारी. त्यांच्या कोकणी भाषेची स्थिती पाहिली, तर मालवणी किंवा गोमंतकी पेक्षाही वाईट. त्यांनी जर ती भाषा सोडावी, तर मग घरची भाषा मराठी करावी, किंवा ती ती देशभाषाच घरी चालवावी ? हा प्रश्न बिकट दिसतो खरा, परंतु याचा निकाल सरळ आहे. कारण त्या गोष्टींचा आम्ही आमच्या मते कसाही निर्णय केला, तरी तो त्या लोकांच्या कानी जाऊन पडण्याचीच प्रथमतः मोठी भ्रांती. तेव्हा त्याप्रमाणे वागणे किंवा न वागणे ही दूरची गोष्ट होय. परंतु जर हा लेख मूळ रूपाने किंवा निदान भाषांतररूपाने तरी त्यांच्या पाहण्यात येईल आणि जर त्यांना हा विषय विचार करण्यासारखा आहे इतके वाटू लागेल, तर आमची अशी खात्री आहे की ज्यांना जो योग्य मार्ग तो सहज मिळेल. तो असा – देशभाषा ज्या आहेत, त्यांचा तर ते सध्या अभ्यास करीतच आहेत. त्याप्रमाणेच इतउत्तर पुढेही तो अभ्यास त्यांनी चालविला

पाहिजे. कारण देशभाषेवाचून गत्यंतर नाही. परंतु ती भाषा सहज होते, शाळांमध्ये तिचा अभ्यास चालतो. कामकाजांमध्ये वहिवाटीनें ती येते. परंतु घरी बोलायची जी भाषा तिच्याजागी त्यांनी ती ती देशी भाषा घ्यावी अशी आम्ही कधीही संमती देणार नाही. त्यांना स्वभाषा सोडून, देशी भाषाच घरी चालवा अशी कोणी शिफारस करील, तर आम्हांला ती गोष्ट मान्य होणार नाही. बेहेत्तर त्यांची ती अशुद्ध कोकणी भाषा आहे तशीच पाहिजे तर चालू ठेवावी, आणि बाहेरच्या व्यवहारामध्ये मात्र देशी भाषा चालवावी. परंतु कोणत्याही सबबेने आपल्या घरच्या भाषेमध्ये त्यांनी असा बिघाड उत्पन्न होऊ देऊ नये. तसा बिघाड झाल्यास नफ्यापेक्षा नुकसान फार मोठे होईल. प्रथमतः कदाचित ते लक्षात येणार नाही, परंतु थोडासा विचार करून पाहिला तर आमच्या म्हणण्याचा खरेपणा सहज ध्यानांत येईल. आम्ही म्हणतो, नफ्यापेक्षा नुकसान फार होईल. फार फार नुकसान होईल, त्या नुकसानीची कल्पना-सुद्धा कितीएकांच्या लक्षामध्ये येणार नाही. इतके मोठे नुकसान होईल, असे हे नुकसान कोणते, असा सहज प्रश्न होणार. आमच्या म्हणण्याचा खरेखोटेपणा पहा. त्यांची जी ही सध्याची कोकणी भाषा आहे, हा त्यांचा सहस्रावधी वर्षांचा जागता इतिहास होय. जरी ते शेकडो वर्षे परदेशांमध्ये जाऊन राहिले आहेत. तरी ते कोण ? तर सर्व भरत खंडामध्ये ज्यांपासून वेदादि विद्यांचा प्रसार झाला, ज्यांपासून देशांत मुळी ज्ञानांकुर पसरला, त्या आर्यांचे हे अव्यवहित वंशज आहेत असे या त्यांच्या इतिहासावरून सहज समजते. हे मूळचे उत्तरदेशीय असल्यामुळे महाराष्ट्रादी सांप्रत-काळच्या आर्य लोकांशी जितका त्यांचा मूळचा निकट सहोदरसंबंध आहे, तितक्याचा एक शतांशही त्यांचा द्रविडांशी मूळचा संबंध नाही. यावरून आम्ही द्रविडांचा तिरस्कार करितो असे कोणीही समजू नये. परंतु आमचे म्हणणे इतकेच की सद्-भाग्याने म्हणा, किंवा भाग्याभाग्याची गोष्ट मनात न आणिली तरी, सहजगत्या म्हणा, ज्यांना मूळचे आर्यत्व आहे त्यांनी आर्यत्वाची मोठी खूण जी आपली भाषा ती आपण होऊन टाकून देणे ही गोष्ट फार अयोग्य होय. त्यांनी मराठी भाषाच घेतली पाहिजे. त्यांना मराठी भाषा अवघड जाणार नाही हे वर सांगितलेच आहे, येणेकरून दुसरा एक मोठा चांगला परिणाम होईल. तो असा – देशभाषा जी द्रविड जातीय आहे. तिचे लौकिक कामकाजाच्या संबंधाने त्यांनी ग्रहण केले असल्यामुळे, आर्यांचा आणि द्रविडांचा स्नेहभाव कायमचा कायम राहून, आर्यांचे आर्यत्वही कायम राहील. जर त्यांनी घरीही द्रविड जातीय भाषा घेतली, तर त्याचा जो अनादिसिद्ध उत्तर-देशीय लोकांशी निकट संबंध आहे तो, आणि त्याचे उत्तरदेशीयत्व ही दोन्ही एकदम तुटून जातील, आणि भाषेच्या संबंधाने आम्हाला ते केवळ परकीय बनतील ही गोष्ट आम्हांला तर इष्ट नाही. जे म्हणत असतील की, त्यात काय आहे ? दुहेरी भाषा कशाला पाहिजेत ? एक देशी भाषा आहे तीच सर्वत्र कायम केली म्हणजे झाले, त्यांनी





अनुक्रमणिका

या गोष्टीचा नीट विचार करावा, आणि मग हवे तसे करावे, परंतु आम्हाला तर ती गोष्ट पसंत नाही असे आम्ही पुनः म्हणतो. ज्यांना महाराष्ट्र देशाशी आणि महाराष्ट्र लोकांशी आपले काही कर्तव्य नाही असे वाटत असेल, त्यांनी मराठी भाषेशी असलेला आपला प्राचीन संबंध पाहिजे तर बेलाशकपणे तोडून टाकावा. परंतु त्यांनी इतके खचित समजावे की तसे करणे ही त्यांची मोठी चूक होईल, आणि एकदा हातून गेलेली गोष्ट पुनः सुधरून घेणे फार कठीण, किंबहुना अशक्य होऊन जाईल.

याप्रमाणे गृहीत विषयांच्या संबंधाच्या चारही गोष्टींचे विवेचन केले. यावरून आता आपल्या भाषांचे पुढे काय व्हायचे, याचा निश्चय जरी नव्हे, तरी सामान्यतः झोक सहज लक्षात येईल.

आमच्या भाषांच्या सुधारणेला अनुकूल गोष्टी कोणत्या आणि प्रतिकूल कोणत्या, हेही आमच्या मते आम्ही स्पष्ट केले आहे. अनुकूल गोष्टी जर दिवसेंदिवस प्रबल होत जातील, तर आमच्या भाषांचा भरभराट होत जाईल, नाही तर त्याचा मोड होत जाईल हे सांगितले पाहिजे असे नाही. तथापि मराठी भाषेचे अभिमानी सर्व लोक या सर्व गोष्टींचा चांगला विचार करतील, आणि तिची योग्य सुधारणा आणि योग्य भरभराट करण्याकडे आपले पूर्ण लक्ष देतील, अशी पूर्ण आशा धरून, हा विषय आता आटोपता घेतो.

या विषयाच्या संबंधाने ज्या कोणास काही सुचवायचे असेल, किंवा आपले मत प्रसिद्ध करावयाचे असेल, त्यांनी ते आम्हांकडे लिहून पाठविल्यास, अनुकूल किंवा प्रतिकूल कसेही असो, त्याला मोठ्या संतोषाने या पुस्तकात स्थळ दिले जाईल.

**पूर्व प्रकाशन : विविधज्ञानविस्तार २१ : ९–१०. २०७–७, सप्टेंबर–ऑक्टोबर १८८९.**

## वरील लेखाच्या निमित्ताने एक टिपण

इंग्रजी अमलाबरोबर अनेक नव्या गोष्टी मराठी समाजाने आपल्याशा केल्या. नियतकालिकांचा उदय ही इंग्रजांच्या संपर्कामुळेच महाराष्ट्रात सुरू झालेली एक महत्त्वाची घटना आहे. इंग्रजी राजवटीत नव्याने माहीत झालेली मुद्रणाची सोय नियतकालिकांच्या निर्मितीस आणि त्यांच्या वाढीस सहायक ठरली. इंग्रजी वाङ्मयाच्या परिशीलनातूनच नवी जीवनमूल्ये तत्कालीन विचारवंतांना परिचित झाली. या मूल्यांच्या प्रकाशात ऐहिक आणि वर्तमानकालीन जीवनातील समस्या त्यांना महत्त्वाच्या वाटू लागल्या. मराठी समाजजीवनाच्या सर्व बाबतींतील मागासलेपणा नाहीसा व्हावा आणि ऐहिक विद्या व शास्त्रे यांचा समाजाला परिचय व्हावा हा हेतू १९ व्या शतकामधल्या बहुसंख्य नियतकालिकांत स्पष्टपणे जाणवतो. प्रबोधनाच्या चळवळीत सर्व-

सामान्य माणसांचाही सहभाग असावा अशी एक धारणाही त्याबरोबर दिसते. सोबतच्या लेखाच्या शेवटी लेखकाने वाचकांना केलेले आवाहन म्हणूनच महत्वाचे आहे.

'विविधज्ञान विस्तारा'तून भाषाविषयक लिखाण पुष्कळच आले आहे. मराठीच्या उत्पत्तीसंबंधीचा गाजलेल्या वैद्य–गुणे वादापासून तो '' वन्से ' हा शब्द चालवणे, ' 'विधवा स्त्रीस गंगाभागिरथी म्हणण्याचा प्रघात कसा पडला' अशा छोट्या टिपणांपर्यंत त्या लिखाणाचा आवाका आहे.

'आपल्या भाषेचे पुढे काय होणार' या निनावी लेखात मराठीच्या स्थानाच्या आणि विकासाच्या संदर्भात जे चिंताजनक चित्र रंगविलेले आहे, त्यात आजही फारसा फरक पडलेला नाही याकडे वाचकांचे लक्ष खेदपूर्वक वेधावेसे वाटते. 'महाविद्यालयीन अभ्यासक्रमात मराठीचे स्थान काय असावे,' याचा योग्य तो निर्णय न झाल्यामुळे या प्रश्नावर आजही चर्चा आणि आंदोलने घडताना दिसतात. प्रस्तुत लेखात या समस्येचा निर्देश झालेला आहे. शिवाय 'विस्तारा'च्या अन्य अंकात (विशेषतः ३२ व्या पुस्तकात) या प्रश्नाची वेळोवेळी चर्चा झालेली आहे. इंग्रजीचे वाढते वर्चस्व आणि मराठी नाकारुन 'प्रतिष्ठित' भाषा म्हणून इंग्रजी स्वीकारण्याची सुशिक्षितांची वृत्ती यांची चर्चादेखिल प्रस्तुत लेखात झालेली आहे. आजही इंग्रजीविषयीची प्रतिष्ठेची भावना समाजातून नाहीशी झालेली नाही. शिक्षणाच्या माध्यमाबद्दल चर्चा करताना या वृत्तीचे कढ जाणवतातच. लेखनाला वाचक न मिळण्याची कारणे शोधण्याचा. लेखकाचा प्रयत्न आजही मार्मिक वाटावा असा आहे.

प्रस्तुत लेखाची काही वैशिष्ट्ये मुद्दाम नोंदवण्यासारखी आहेत. या लेखाची शैली तत्कालीन वैचारिक गद्याला शोभेल अशी प्रौढ आणि गंभीर आहे. अलंकरणाचा अकारण वापर मात्र हेतुपूर्वक टाळलेला आहे. काय सांगायचे आहे याविषयी लेखकाची मते स्पष्ट असल्यामुळे मांडणीमध्ये दुर्बोधता आलेली नाही. मराठीविषयी लेखकाला वाटत असलेला अभिमान लेखात जागोजागी व्यक्त होत असला, तरी परभाषांच्या तिरस्काराचा सूर मात्र कुठेही लावलेला नाही. इंग्रजीचेही योग्य ते महत्त्व लेखकाने मान्य केलेले आहे. भाषेमुळे एकात्मता साधते, ज्याला भाषेचा अभिमान नाही, त्याला देशाचा अभिमान नाही, पोटभाषांचा केवळ अभिमान असून काय उपयोग, त्यांच्यामध्ये कोश-व्याकरणादी साहित्य तयार करून त्यांना समृद्ध करण्याचा प्रयत्न झाला पाहिजे, पोटभाषा समृद्ध झाल्या तरी व्यापक संज्ञापनासाठी प्रमाणभाषा लागणारच–हे लेखकाचे विचार सर्वमान्य होणारेच आहेत.

पोटभाषा आणि प्रमाण भाषा (लेखकाच्या शब्दांत 'शुद्ध भाषा') यांच्या संबंधात मात्र लेखकाने अशास्त्रीय वाटावी अशी विधाने केलेली आहेत. प्रमाणभाषा ही 'शुद्ध भाषा' आणि पोटभाषा या 'गावंढळ भाषा' हा शुद्धाशुद्धतेवर आणि

भाषिक श्रेष्ठ-कनिष्ठतेवर आधारलेला दृष्टिकोण आज मान्य होणारा नाही. पोटभाषांच्या संसर्गामुळे शुद्ध भाषा बिघडत जाईल, हा विचारदेखील याच दृष्टिकोनातून आलेला आहे. प्रमाणभाषा आणि बोली यांचा एकमेकींवर परिणाम होतच असतो, या वस्तुस्थितीचे नेमके आकलन लेखकाला झालेले दिसत नाही.

'पोटभाषांमध्ये कोश-व्याकरण-साहित्य यांची निर्मिती करणे नजिकच्या काळात तरी शक्य नसल्याने, पोटभाषा बोलणाऱ्यांनी शुद्ध भाषेत बोलण्याची रीत सुरू करावी, हीच त्या पोटभाषेची सुधारणा आहे' हे लेखकाने ठामपणे केलेले निदान गंमतीशीर आहे. अशुद्ध भाषा बोलणाऱ्यांनी शुद्ध मराठी स्वीकारली आणि नव्या संततीला शुद्ध मराठी शिकवली की मराठीचे स्वरूप एकजिनसी होईल, हा लेखकाचा आशावाद असाच भाबडेपणाचा आहे. भाषेचे स्वरूप फार काळ एकजिनसी राहणे शक्य नसते. त्या त्या समाजाच्या गरजा, भौगोलिक अंतर, अन्य बोलींचा परिणाम इत्यादी कारणांमुळे भाषेचे स्वरूप बदलत असते. भाषिक परिवर्तनाच्या दिशेचा अंदाज लेखकाला आला नसावा, असेच यावरून वाटते. पोटभाषा बोलणाऱ्यांनी प्रमाणभाषाच बोलावी, असा आग्रह धरणाऱ्या लेखकाने कोकणीच्या बाबतीत मात्र पंक्तिप्रपंच केलेला आहे. कोकणी भाषकांनी प्रमाण मराठी बाहेरच्या व्यवहारात वापरावी, असे जरी त्याला वाटत असले, तरी कोकणी भाषा सोडून देण्याची कल्पना मात्र त्याला रुचत नाही. याचे कारण एकच की कोकणी भाषकांना लेखक आर्यांचे अव्यवहित वंशज आणि कोकणी भाषेला आर्यत्वाची खूण मानतो. इंग्रजांच्या राजकीय व सांस्कृतिक वर्चस्वामुळे १९ व्या शतकात मराठी समाजाच्या स्वाभिमानावर प्रहार झालेले होते. ते परतविण्यासाठी इंग्रजांप्रमाणे आपणही आर्यवंशीय आहोत, हे सिद्ध करण्याची आणि आर्यत्वाशी संबंधित असलेल्या गोष्टींची श्रेष्ठ समजून जोपासना करण्याची भावना विचारवंतांमध्ये निर्माण झाली होती. या युगश्रद्धेचेच हे 'भाषिक' प्रतिबिंब असण्याची शक्यता आहे.

**अंजली सोमण, श्री. ना. दा. ठाकरसी महिला महाविद्यालय, पुणे ४११ ००४**

---

## असाही एक व्युत्पत्तीचा शोध

हिंदी भाषी अशिक्षित लोक 'सोसाइटी'चा उच्चार 'सौसाठी' असा करतात. त्याबद्दल छेडले असता एकाकडून असे उत्तर मिळाले :

'नहीं जी, सौसाठी ही ठीक है, जहां सौ दिये जाते हैं और साठ की पावती मिलती है वह सौसाठी कहलायेगी नहीं तो क्या?'

---

## मराठी भाषेच्या भवितव्याबद्दल चिंता

आपल्या भाषेची स्थिती. **विविधज्ञानविस्तार** ६ : ७. १३०–४, डिसेंबर १८७३.
आपल्या भाषेचे पुढे काय होणार ? **विज्ञावि** २१ : ९–१०. २०७–१७, सप्टेंबर–ऑक्टोबर १८८९.
मराठी भाषेची सांप्रतची स्थिती व तिच्या उत्कर्षाचा इतिहास **विज्ञावि** २९ : ७. १९३–२००, जुलै १८९८; २९ : ८. २३९–४५, ऑगस्ट १८९८; २९ : ९. २७४–७९, सप्टेंबर १८९८.
राजवाडे, वि. का. **मराठी भाषा मुमूर्षु आहे काय ?** पुणे : महाराष्ट्र-शारदा-मंदिर, १९२६. ( अध्यक्षीय भाषण, शारदोपासक संमेलन, १ ले, पुणे १९२६ ) शिवाय समावेश : निरंतर, गं. भा; देव, दि. वि. ( संपा. ) **शारदा-विहार**. पुणे : महाराष्ट्र-शारदा-मंदिर, १९४०. पृ. १–३१.
राजवाड्यांच्या भाषणावर प्रतिक्रिया : कोल्हटकर, श्री. कृ., अध्यक्षीय भाषण, मराठी साहित्यसंमेलन, १२ वे, पुणे १९२७. ( **लेखसंग्रह**, मुंबई १९३२; **समग्र कोल्हटकर,** खंड २, मुंबई १९७५.) केतकर, श्री. व्यं., मागणी तसा पुरवठा १९२७ ( **शारदा-विहार**, पृ. ३२–५२ ). वरेरकर, भा. वि. मराठी भाषा जगेल – पण कशाने ? ( **शारदा-विहार**, पृ. ३३२–४८ ).
चाफेकर, श्री. ना. मराठीचे भवितव्य. समावेश : चाफेकर, **साहित्य आणि समाज : निबंध**. पुणे : लेखक, १९६५, पृ. २७–३९.
मराठी साहित्यसंमेलन, स्वतंत्र, मुंबई, डिसेंबर १९८१, चर्चासत्र ३ मराठी भाषेचे भवितव्य. उपोद्घात : मे. पुं. रेगे यांचा निबंध, छापील पुस्तिका. अशोक रा. केळकर, लेख, **अभिरुची** २३ : ६. ७–१४, नोव्हेंबर–डिसेंबर १९८१. ( समावेश : **वैखरी**, मुंबई : मॅजेस्टिक, १९८३ )
शिरवाडकर, वि. वा. मराठी अन्याय निर्मूलनविषयक विचार. **महाराष्ट्र टाइम्स** १९७७, १०, २३.
[ एखाद्या एम्. फिल्. प्रबंधाची हा विषय वाट पाहतो आहे असे म्हटले तर ? – संपादक ]

# भाषायण

टॉमस स्टर्न्ज एलियट

## शब्दाला गती असते, संगीताला गती असते....

शब्दाला गती असते, संगीताला गती असते
केवळ कालप्रवाहात, मात्र ज्याला केवळ जिणं असतं
त्याला केवळ मरणं असणार. बोलणं संपल्यावर, शब्दांची गती
मूकतेमध्ये जाऊन ठेपते. केवळ आकृतीच, केवळ तिचा बंधच
हा शब्दाला काय किंवा संगीताला काय थेट स्तब्धतेत
पोचवू शकेल. तुम्ही पाहिलं आहे का तसलं चायना जार
कसं आपल्या स्तब्धतेत कायम गतिमान राहतं !
सूर गुंजत राहतो तोवर टिकणारी व्हायोलिनची स्तब्धता
ही नाही बरं ! ही तर सह-अस्तित्वाची,
असं म्हणा पाहिजे तर की सुरुवातीच्या अगोदर शेवट असतो,
आणि शेवट आणि सुरुवात तर नेहमीसाठी असतात
केव्हापासूनची– अगदी सुरुवातीच्या अगोदर, शेवटाच्या नंतर.
जे काही असतं ते सगळंच, नेहमीच आतासाठी असतं. या ओझ्याखाली
शब्दांना ओढ बसते, तडा जातो, काही तर तुटतात ताणापायी,
निसरतात, घसरतात, नष्ट पावतात,
नेमकेपणाच्या अभावी विटतात, जागच्या जागी रहात नाहीत,
देवासारखे एका जागी बसत नाहीत, किंचाळणारे आवाज
त्यांना फैलावर घेतात, त्यांची खिल्ली उडवतात, नाही तर नुसतेच वटवट करीत
त्यांच्यावर हल्ला चढवतात. विराणातला तो ख्रिस्तरूपी प्रणवशब्द
मोहाच्या शब्दांनी वेढला जातो, पीडला जातो,
तसाच मर्तिकाच्या नृत्याच्या आरडत्या सावलीनं,
सांत्वनाच्या पलीकडच्या, मोठ्यानं गळा काढणाऱ्या पिशाच्चानं.

Burnt Norton १९३५, छेदक ५ मधून





अनुक्रमणिका

## शेवट आणि सुरुवात....

ज्याला आपण सुरुवात म्हणतो तो खूपदा शेवट असतो
आणि शेवट करायचा म्हणजे सुरुवात करायची असते.
जिथून आपण निघतो तो शेवट असतो. आणि जो जो शब्दबंध,
जो जो शब्द खरा उतरतो ( म्हणजे असं की प्रत्येक शब्द जिथल्या तिथं,
आजूबाजूच्यांना तोलून आपल्या जागी राहणारा,
ना कचरट आणि बुजरट ना दाखवेगिरी करीत मिरवणारा,
जुनं आणि नवं यांची सहजी घसट साधणारा शब्द,
कधी रोजच्या वळणातला, अगोचरपणा न करता मुक्कामावर पोचणारा,
कधी तालेवारपणे पण पढीकपणा टाळून अब्रूला जपणारा,
सारी जमलेली, नाचण्यात दंगलेली मंडळी )
तो तो शब्दबंध, तो तो शब्द शेवटही असतो आणि सुरुवातही,
प्रत्येक कविता एका सरलेल्या आयुष्याचं भरतवाक्य असते.

Little Giding १९४२, छेदक ५ मधून
**सूचक : पु. ल. देशपांडे, अनुवादक : अशोक रा. केळकर**

---

## भाषेबद्दलचे चार शब्द

व्याकरण म्हणजे लोकांचे तत्त्वज्ञान.

**आनंदी विद्या** Die fröhliche Wissenschaft **१८८२, सूक्ती ३५४**

ज्या ठिकाणी कमी-जास्तची बाब असते, सूक्ष्मातिसूक्ष्म तरतमभाव असतो, त्या ठिकाणी भाषा एक घाव दोन तुकडे करून, सरळ विरोध मानून मोकळी होते.

**सत् आणि असत् यांच्या पलीकडे** Jenseits Von Gut und Böse **१८८६ सूक्ती २४**

भाषेचा समज असतो म्हणा, गैरसमज असतो म्हणा, की प्रत्येक क्रियेला एक कर्ता कारण असतो.

**नीतिमत्तेची कुळकथा** Zur Genealogie der Moral **१८८७, भाग १**
**फ्रीड्रिछ व्हिल्हेल्म नीत्शे ( १८४४–१९००, जर्मन तत्त्ववेत्ता )**

---

# श्री. के. क्षीरसागरांचा भाषाविवेक

सत्त्वशीला सामंत

श्री. के. क्षीं. नी आयुष्यभर ज्या ज्या गोष्टींवर मनापासून प्रेम केले, त्यापैकी 'भाषा' ही एक होती. आपल्या प्रेमपात्र वस्तूंना कसलाही धक्का लागला की, त्यांच्या संरक्षणार्थ ते नेहमी योद्ध्याच्या आवेशाने पुढे होत आणि तो हल्ला परतवून लावण्यासाठी शस्त्र हाती घेत सुमारे १९३६ सालापासून ते तहत आयुष्याच्या अखेरपर्यंत म्हणजे १९८० सालापर्यंत ते हा लढा लढत होते.

आरंभीच्या काळात सावरकर आणि माधव जूलियन यांनी पुरस्कारिलेल्या 'भाषाशुद्धी'च्या निमित्ताने श्री. के. क्षीं नी त्यांच्याशी सामना केला खरा. पण त्यांचे शत्रुत्व व्यक्तींशी नव्हते, तर भाषाक्षेत्रात शिरलेल्या अपप्रवृत्तींशी त्यांचे भांडण होते.

'भाषाशुद्धी'च्या नावाखाली त्या काळात फक्त इंग्रजी व फारसी उर्दू या तथाकथित परकीय भाषांपुरता फाजील सोवळेपणा पाळला गेला. त्यामुळे सहजगत्या व दीर्घकाळ रुळलेल्या इंग्रजी व फारसी-उर्दू शब्दांची हकालपट्टी सुरू झाली व त्या जागी नवे स्वकीय शब्द रूढ करण्याचा प्रयत्न झाला. पण जातिवंत मराठी शब्दांबाबतचे अज्ञान आणि पूर्वी आपल्याकडे काहीच नव्हते व प्रत्येक संस्थेचे वा कल्पनेचे (नव्याने) भाषांतर करण्याखेरीज गत्यंतर नाही ही लाचारी या दोन दुर्गुणांपायी नव्या बेंगरूळ शब्दांची भर पडली. नवशब्दनिर्मितीच्या हव्यासापोटी 'दांडगेश्वर नीतीचा अवलंब करून हे शब्द भाषेवर लादले गेले. कधी कधी इंग्रजी शब्दांच्या वर्णलेखनाशी सादृश्य साधण्याचा अट्टाहास दिसून आला. अलीकडच्या काळात तर सरकारतर्फे जे मराठीकरणाचे प्रयत्न झाले त्यामध्येदेखील शैलीनिर्मितीऐवजी शब्दनिर्मितीवर चुकीने अधिक भर दिला गेला. त्यामुळे स्वतंत्र व्यावहारिक मराठीऐवजी 'इंग्रजी मराठी अवतार' अशा थाटाची मराठी तयार झाली. परकीय शब्दांवर नको तेथे बहिष्कार व नको तेथे परभाषेतील अनोळखी शब्दांचा भडिमार व जोडीला संस्कृतचे अज्ञान. हिंदीच्या जास्तीत जास्त जवळ पोचणे म्हणजे एकराष्ट्रीयत्वाच्या जवळ पोचणे ही एक आणखी एक भ्रामक कल्पना. म्हणून श्री. के. क्षी. म्हणतात — "नवीन शब्द व प्रयोग तर्ककर्कश टांकसाळ्यांच्या हाती देऊन चालत नाही. ते





अनुक्रमणिका

भाषाप्रचाराचा मक्ता न घेता, हृदयाचा ठाव घेण्याकरता लिहिणाऱ्या प्रतिभावान् व नैसर्गिक लेखणीतून नकळत जन्मावे लागतात. ”

‘ आधी भाषा, मग कोश ’ हाच श्री. के. क्षीं. ना नैसर्गिक क्रम वाटत असे. पण कधी कधी ‘ आधी कोश, मग भाषा ’ हा कृत्रिम मार्ग चोखाळावा लागतो. त्याही बाबतीत त्यांचे म्हणणे असे की –

“ स्वभाषेच्या प्रकृतीचे सूक्ष्म ज्ञान, वाचकांना सुबोध अर्थप्रतीती करून देण्याची तळमळ व योग्य स्थळी योग्य शब्द सुचवण्याइतपत भाषाप्रभुत्व इतक्या गोष्टी एकत्र असतील तरच स्वभाषेची विटंबना आणि सामान्य वाचकाचे हाल न करता नवे शब्द योजता येतील. ”

मराठीच्या भाषाशैलीप्रमाणे भाषणशैलीचाही विचार त्यांनी केला होता. त्यांच्या मते चित्रपट, नाटके व रेडिओ यांच्याकरवी समाजाची भाषणशैली घडवली व बिघडवली जाते. वृत्तपत्रे व ग्रंथ यांच्यामार्फतही भाषादोषांचा प्रसार होऊ शकतो. “ ग्रंथांचा दुष्परिणाम वृत्तपत्रांहूनही अक्षम्य होय. ” असे असले तरी, ग्रंथकर्त्यां-प्रमाणे वृत्तपत्रकारांनीही याबाबत काळजी घ्यावयास हवी, कारण “ हा प्रश्न दोषाच्या समर्थनाचा नसून, दोष टाळण्याची पहिली पायरी म्हणजे त्या दोषांकडे डोळे उघडून पाहणे ही होय. ”

‘ विद्यापीठ ग्रंथनिर्मिति मंडळा ’ने व ‘ बालभारती ’ या सरकारी संस्थेने मराठी-तून पाठ्यपुस्तके लिहिण्याचे काम अलीकडे हाती घेतले आहे. पण ही पाठ्यपुस्तके लिहिताना कोणती पथ्ये पाळावीत त्यासंबंधी श्री. के. क्षीं. नी फार जुन्या काळीच मार्गदर्शन केले आहे. विषयाचे उत्कृष्ट आकलन, स्वभाषेवर चांगले प्रभुत्व व तो विषय सुगम मराठीतून शिकवण्याची जिद्द या तीन गोष्टींची शिदोरी जवळ असली की पाठ्यपुस्तकाच्या लेखकाला मुक्काम गाठणे अवघड होऊ नये. त्या त्या विषयांतील तज्ज्ञांनी मराठीत लिहिलेली पाठ्यपुस्तके मराठीच्या प्राध्यापकांनी भाषिक अंगाने तपासावीत, म्हणजे पाठ्यपुस्तके भाषांतरित असली तरी भाषांतरी वळणाची राहणार नाहीत.

भाषा हे संस्कृतीचे सूक्ष्म पण महत्त्वाचे अंग होय. “ संस्कृतीचे जीवन आणि मरणही सूक्ष्म गोष्टींतच असते. ” म्हणून मराठी भाषेच्या संवर्धनाकडे दुर्लक्ष केल्यास, मराठी संस्कृतीचा ऱ्हास होईल.

पण मराठीचा दुरभिमान नसावा. मराठीच्या विकासासाठी इतर भाषांचाही अभ्यास आवश्यक आहे. कोणत्याही भाषेचा अतिरेकी हव्यास वा दुस्वास नको. म्हणून “ संस्कृतशिवाय भारतीय अभ्यासक्रम म्हणजे ‘ रामाशिवाय रामायण ’ ” असे श्री. के. क्षी. म्हणतात. “ इंग्रजीतून शिकू नका ” असा त्यांचा सल्ला असला तरी “ इंग्रजी शिका ” असा त्यांचा आग्रह असे. हिंदीला राजभाषा म्हणून नव्हे तर लोकभाषा





अनुक्रमणिका

म्हणून त्यांनी महत्त्व दिले.

अलीकडे सरकारी शिक्षणतज्ज्ञांनी 'अखिल भारतीय शब्दावली 'चे तत्त्व अव-लंबिले आहे. संस्कृत या जननी भाषेच्या आधारे सर्व भारतीय भाषांमध्ये एकरूप संस्कृतनिष्ठ परिभाषा स्वीकारावी असा त्यांचा आग्रह असतो. हे तत्त्व कितीही सोज्ज्वळ असले तरी व्यवहार्य नाही हे श्री. के. क्षीं. नी दाखवून दिले कारण एकच संस्कृत शब्द निरनिराळ्या भाषांत वेगवेगळ्या अर्थांनी विकसित झाला आहे आणि उलटपक्षी, एकच संकल्पना दर्शविण्यासाठी वेगवेगळ्या भाषांत वेगवेगळे प्रतिशब्द प्रचलित आहेत, त्यामुळे हे तत्त्व फक्त नवीन संकल्पनांच्याच बाबतीत अंमलात आणणे शक्य आहे.

भारतीय राज्यघटनेप्रमाणे हिंदीने आपल्या विकासासाठी इतर भाषांचे साहाय्य घेणे अपेक्षित आहे. पण प्रत्यक्षात हिंदी ही इतर भाषांवर आक्रमण करून त्यांच्या विकासात अडथळा आणीत आहे. प्रत्येक भाषेला विशिष्ट नाद असतो. तिचा विशिष्ट पिंड असतो. प्रकृतिधर्म असतो व तो सांभाळूनच तिचा विकास करावयाचा असतो.

म्हणून दैनंदिन व्यवहाराच्या भाषेपुरते राज्यसरकारचे धोरण लोकानुवर्ती असावे. शास्त्रीय परिभाषेच्या बाबतीत मात्र शास्त्रशुद्ध धोरण अवलंबावे, पण शास्त्रीय परि-भाषेसाठी त्या त्या विषयातील तज्ज्ञांसमवेत जशी भाषाशास्त्रज्ञांची आवश्यकता असते त्याप्रमाणे त्यांना भाषासौंदर्याचीही दृष्टी हवी असे श्री. के. क्षी. सुचवतात,

भाषिक सौंदर्याच्या जोडीला श्री. के. क्षी. नी लिपीच्या सौंदर्याचाही विचार केला होता. ('बालबोध लिपीवर गंडांतर') "यंत्राची सोय पाहण्याकरता सर्वपरिचित लिपी बदलण्याचा प्रयत्न करणे" बरोबर नव्हे असे त्यांचे मत होते साहित्य–महा-मंडळाने जेव्हा शुद्धलेखन पद्धतीत बदल करण्याचा प्रस्ताव केला तेव्हा श्री. के. क्षीं. नी सुरुवातीला तडजोडीची भूमिका घेऊन, लेखनपद्धतीत काही बदल करण्यास रुकार दिला होता हे खरे. पण पुढे पुढे 'शुद्धलेखनाचे गुन्हाळ' तसेच चालू राहिले ही गोष्ट त्यांना पसंत पडली नाही.

'रोमँटिसिझम्'च्या या पुरस्कर्त्याने आयुष्यभर आपली भाषा त्याच सौंदर्यासक्त वृत्तीने हाताळली. कारण त्यांनीच म्हटल्याप्रमाणे "संस्कृति, शुद्धता आणि माधुर्य यांचे मापन घडापासरीने करावयाचे नसून, तोळामाशांनीच करावयाचे असते!"

**द्वारा : भाषासंचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई ४०० ०३२**

[श्री. के. क्षीरसागर यांच्या भाषाविषयक लेखांचा संग्रह लेखिकेने संपादून मुद्रण-प्रत सिद्ध केली आहे. त्यावर प्रस्तुत संकलनलेख आधारलेला आहे. संपादक सामंत प्रकाशकाच्या शोधात आहेत. या बाबतीत रस असणारांनी त्यांच्याशी संपर्क अवश्य साधावा. – संपादक]

# मराठीतील शिव्या

श्री. ना. चाफेकर

पाश्चात्त्य जगाकडे भारताचा आध्यात्मिक प्रभाव पडत आहे हे पाहून अस्वस्थ होणाऱ्या एकोणिसाव्या शतकातील एका फ्रेंच ख्रिस्ती मिशनऱ्यानं आपल्या पाश्चात्त्य बांधवांस इशारा दिला – तुमची अशी कल्पना असेल की आपण भारतावर राज्य करीत आहोत, पण खरे म्हणजे भारतच पाश्चात्त्यांवर सत्ता गाजवीत आहे; जर आपण लवकर जागे झालो नाही तर ख्रिस्ती धर्माचे दिवस भरत आले असे समजा. ज्या भारतीय संस्कृतीच्या प्रभावाचा त्याने एवढा धसका घेतलेला दिसतो ती संस्कृती वेदाभ्यासी ब्राह्मणांपुरतीच घुटमळत राहिलेली नसून अगदी वन्य किंवा फिरस्त्या जातीजमातींपर्यंत भारतीयांच्यामध्ये भिनलेली आहे. तसेच हेही खरे की ही भारतीय संस्कृती अगदी ओव्यांपासून अक्षरशः शिव्यांपर्यंत प्रकट होताना दिसते. नेहमीचे शिष्टाचाराचे संस्कार बाजूला ठेवून शुद्ध भाषाशास्त्रीय आणि समाजशास्त्रीय दृष्टीने निरीक्षण केले तर हे सहज समजून येईल की संस्कृतीचा अभ्यास करावयास शिवी-सारखे उत्तम साधन नाही.

साधारणपणे शिव्या ह्या धर्मशास्त्रातून उगम पावतात. धर्मशास्त्र जितके उच्च विचाराचे तितक्या शिव्या उच्च प्रतीच्या ? एखाद्याची आत्यंतिक निर्भर्त्सना कराव-याची झाली तर ती कोणत्या उपायाने करणार ? समाजात धर्मशास्त्राप्रमाणे जे सर्वांत निंद्य वर्तन म्हणून प्रतिष्ठितांनी मानले आहे त्याचे पाप त्याच्या माथी मारणे, हा शब्दाचा मार सुज्ञालाच नव्हे, तर अडाण्यालासुद्धा भयंकर लागतो हे आपण प्रत्यही पाहतो. शिवीगाळीमुळे मारामारीस सुरुवात होते. म्हणजे शब्दांचा मार असह्य होत असल्याचे हे लक्षण आहे. पुढे दिलेल्या शिव्यांच्या मीमांसेतून हे स्पष्ट होईल की वैदिक ब्राह्मण व शूद्रातिशूद्र ह्या दोघांच्या जीवनातील श्रद्धेय कल्पना एकच आहेत. फक्त भावनेच्या आविष्कारात अंतर पडते.

स्त्री-पुरुष संबंधातील धर्मशास्त्राची कडक बंधने हा शिव्यांचा मूलाधार.

मराठीतील शिव्यांत स्त्री-पुरुषांच्या गुप्तेंद्रियांची नावे सर्रास येतात. ही नावे वरकरणी बहुतेक संस्कृतोद्भव वाटली तरी, व्युत्पत्तिकाराचे म्हणणे असे आहे की शरीराच्या बहुतांश अवयवांची नावे द्राविडी भाषांतून आलेली आहेत. नंतर त्यातील

काहीनी संस्कृतरूप धारण केले. उदा. लवडा, पुच्ची, भोसडी इत्यादी तर चोट (चुत), फोदरी ( फोदर–अपोदर; पोटाच्या खालचा भाग) ही शुद्ध संस्कृत आहेत. त्याचप्रमाणे झवणे म्हणजे धवणे. संस्कृत धव ( म्हणजे नवरा ) ह्याचे क्रियापद नवरेपणाचे कार्य करणे.[१]

धर्मशास्त्राप्रमाणे बोलायचे तर पुत्रसंभव नसताना पतिपत्नींनी संभोग करू नये. पुत्रसंभव नसताना संभोग केल्यास ते निंद्य कर्म, पातक होते. केवळ इंद्रिय सुखा-करिता केलेला संभोग हा निर्भर्त्सनेस पात्र होतो. अशा संभोगांतून जन्म पावलेला पुत्र हाही निंद्य. ह्याचे प्रतीक म्हणून त्या त्या इंद्रियांच्या नावाने संबोधणे ही मोठी निर्भर्त्सना ! उदा. फोद्रीच्या, च्यूत्या, चोदिच्या, भोसडीच्या इत्यादी.

ह्यावरून मुडदा ह्या शिवीची आठवण होते. मुसलमानात बकरा, गाय कापतात. ह्यामागेही धर्मशास्त्र आहे. कुराणांतील मंत्र म्हणून मगच जनावरास शस्त्र लावायचे. व असेच जनावराचे मांस देवाला वाहावयाचे असते. मंत्र म्हणून कापण्याचा अधिकार केवळ मुलाण्याला असतो. जे जनावर मंत्र म्हणून कापले नाही त्या जनावराच्या प्रेतास मुडदा म्हणतात. मुडदा हा अशुद्ध. देवास वाहाण्याच्या लायकीचा नाही. माणसाची निर्भर्त्सना 'मुडदा' ह्या शब्दाने केली म्हणजे त्याचे मेलेले मांससुद्धा अपवित्र आहे, इतका तो अशुद्ध !

शिवी साधारणपणे चातुर्वर्ण्यातील वर्णाप्रमाणे दिली जाते असे दिसते. केवळ इंद्रियजन्य सुखाकरिता केलेला संभोग चारी वर्णांत शक्य आहे. त्यामुळे उपरोक्त इंद्रियजन्य संबोधने सर्व वर्णांत उपयोगात येतात. व्रात्य, कार्टा, चांडाळ ह्या शिव्या मात्र ब्राह्मणांतच आढळतात. ब्राह्मणीला ब्राह्मणापासून अनैतिक मार्गाने पुत्र झाला व त्याचे उपनयन झाले नाही तर तो पुत्र सावित्रीव्रतास मुकतो. अशा पुत्रास मनुस्मृतींत 'व्रात्य' ही संज्ञा दिली आहे. 'व्रात्य' इतर वर्णांत निपजणे अशक्य आहे. ब्राह्मणीला शूद्रापासून पुत्र होतो त्यास मनुस्मृतीने 'चांडाल' ही संज्ञा दिली आहे. 'चांडाळ', अशी शिवी ब्राह्मण स्त्री देते. कार्टा हा स्मशानात अन्त्यकर्म करणारा ब्राह्मण. तो त्याच्या व्यवसायामुळे पुढे हलका ब्राह्मण गणला जाऊ लागला. म्हणून 'कार्ट्या' ही शिवी ब्राह्मणांतच आढळेल.

धर्मशास्त्राप्रमाणे आई व बहीण त्या स्त्रियांपासून पुरुषाला संतती होत नाही. झालीच तर ती विकृत निपजते असा समज आहे. म्हणून धर्मशास्त्राने त्या दोघींशी संभोग हा अत्यंत गर्हणीय मानला आहे. त्या असंभोग्य म्हणून पवित्र. त्यामुळे शास्त्रकारांनी मात्रागमन हे पंचमहापातकांत मोडले आहे. त्याचप्रमाणे भगिनीगमन. ही दोन्ही प्रकारची 'गमने' सर्व वर्णांत शक्य आहेत. म्हणून ह्यापासून निघालेल्या शिव्या सर्व वर्णांत आढळतात. मादरचोद म्हणजे मात्रागमनी व भेनचोद म्हणजे भगिनीगमनी.[२] मनुस्मृतीने आणखीही एक शिवीचे मूळ दिले आहे. जसे मात्रागमन

वर्ज्य तसे गुरुपत्नीगमन हेही पंचमहापातकांत घातले आहे. परंतु पुढे गुरुगृही विद्या शिकण्याचे बंद झाले त्यामुळे बहुधा ह्या पातकाची शिवी निर्माण झाली नसेल. आई, बहीण इ. स्त्रियांस अनैतिक कर्मास लावून त्यांच्यावर जो आपली उपजीविका करतो त्यासही मनूने पातकीच म्हटले आहे. अशा स्त्रिया दुसऱ्या पुरुषास जो 'भाड्याने' देतो तो 'भडवा' किंवा 'भाड्या.'

ज्या धर्मांत उच्च कल्पना नाहीत त्या धर्मातील भाषांत अशा शिव्या निपजणे कठीण आहे, कारण उच्च शिव्यांस उच्च धर्मकल्पनांची आवश्यकता आहे.

२६४/३ शनिवार पेठ, पुणे ४११०३०

**टिपणे :**

१. या सुचवलेल्या व्युत्पत्त्या अर्थातच नीट पडताळून घ्यायला हव्या. उदाहरणार्थ धव हा शब्द वास्तविक विधवा हा एकसंध शब्द ( तुल्य : इंग्रजी विडो ) बळेच तोडून बनवलेला आहे. ( प्र–णप्तृ पासून आलेला पणतू आणि आर्यपासून आलेला आजा यांची अशीच मोडतोड करून बनलेला पण–जा शब्द आपल्यासमोर आहेच. ) झवणे हा शब्द सिंधी जहणु आणि पंजाबी जहिणां यांच्याप्रमाणे सरळ यभ्– या त्याच अर्थाच्या वैदिक धातूपर्यंत जातो. ( उदाहरणार्थ यजुर्वेद, तैत्तिरीय संहिता, ७ : ४ : १९ : २–३ पाहा. )—संपादक

२. मादर हा आई या अर्थाचा फार्सी शब्द आहे. —संपादक

३. एखाद्याला बायकोचा भाऊ ( मराठी साळा, हिंदी साला ) म्हणणे अपमानकारक का ठरावे हे यावरून स्पष्ट होते. हिंदीमध्ये सालाच्या धरतीवरची 'सुसरा' ( सासरा, या ठिकाणी बायकोचा बाप ) अशीही एक शिवी आहे. या दोन्ही शिव्या दुसरा भडवा आहे हे सुचवणाऱ्या आहेत. —संपादक

---

**शिक्षणाचे माध्यम**

ऐकलं की विसरलं. पाहिलं की लक्षात राहिलं. केलं की समजलं.

**कुंग फू-त्से ( कन्फ्यूशियस, चिनी विचारवंत, इ. स. पू. ६ वे शतक )**

**एकला चलो रे**

ज्या ठिकाणी रस्ते बांधलेले असतात त्या ठिकाणी मी वाट चुकतो.

**रवींद्रनाथ ठाकुर**

---

# भाषेचे प्रदूषण – स्त्रीला भोवणारे

आशा मुंडले

ज्या त्या भाषिक समाजाची परंपरागत मूल्यव्यवस्था त्या त्या भाषेतून प्रतिबिंबित होते. वापरता वापरता आपणही ती मूल्यं कुठेतरी पत्करून बसतो. भाषा आणि भावना यांचा गहिरा संबंध आहे आणि त्यामुळे भाषेतून मुरलेलं मनातून नाकारायला फार प्रयत्न लागतात. भाषेला ' आई ' म्हटलंय कवींनी, ते उगीच नाही. मराठी भाषेपुढे अमृतही तुच्छ. माझ्या मराठीवर माझं प्रेम आहे. पण मराठी भाषाव्यवहार नेहमीच अभिमानास्पद नसतो. असं पाहा—

आम्ही जेव्हा स्त्रियांबद्दल बोलतो तेव्हा ? मराठीत आपण रागाने विचारतो, " काय रे, तुला आई-बहिणी आहेत की नाही ? " म्हणजे आई-बहिणींना ( किंवा त्यांच्यासमान मानलं आहे त्यांना ) सन्मान, परंतु त्यातला गर्भित अर्थ असा की परक्या बाईची चाड ठेवायची पद्धत नाही. शिवाय सम्मानित स्त्रियांमध्ये ' बायको ' नाही. ती आपली ' पायातली वहाण पायातच बरी ' किंवा ' आपलं जनावर आपल्या ताब्यात हवं ' ( हे लक्ष्मण मानेंच्या बंद दरवाज्यातलं वाक्य ).

रांड म्हणजे विधवा आणि संदर्भाने छिनाल स्त्री. उलट सवाष्ण फार शुभ. तिचं कर्तृत्व काय तर नवरा जिवंत आहे. वांझ बाईची आणखीच परवड. ' वाईट चालीचा पुरुष ' ' मूल नसलेला पुरुष ' याला भाषेत वेगळा शब्दसुद्धा नाही. पण वांझेची किती हेटाळणी !

श्रृंगार हा मालकी भावनेशी जोडलेला. नवरा श्रेष्ठ, वरचढ हवा, नवरी कुमारिका, " सीलबंद " हवी. पण ' नाकापेक्षा मोती जड नको ' ' उष्टावलेली मुलगी तर नकोच नको '. मराठी नाटकांमधील आजचे द्व्यर्थी ' विनोद ' म्हणजे माणसाच्या जिव्हाळ्याच्या विषयाबद्दल ओंगळपणे बोलणे आणि त्याला माणूस म्हणवून घेणाऱ्यांनी हसणे या स्पर्धेत मराठीचा नंबर वर लागावा याची शरम वाटते.

कामजीवनाच्या वर्णनातही पुरुष-स्त्री हे नाते शिकारी सावज किंवा खादाड - अन्न या संबंधावर बेतलेले ( ' छातीवरची फळं ', ' तिला पाहून लाळ टपकली, ' ' तिचा चोळामोळा केला, कुस्करली ', ' तिच्यावर झडप घातली ' वगैरे ). असली वर्णनं पुरुषदेहाची होत नाहीत. विविध लैंगिक अनुभव घेतलेला पुरुष हा ' शिळा ' नाहीतर ' रसिक ' बनलेला ठरतो.





अनुक्रमणिका

पुत्रांना जन्माला घालणारी पत्नी हिचा महिमा आहे. (मुलींची आई मात्र केविलवाणी). 'तोंड मिटून सोसणारी', 'पायाची दासी', हळवी, दुबळी स्त्री आमची आवडती! डोकं वापरून अन्याय करून न घेणारी असली तर बोलभांड, जहांबाज, कजाग वगैरे कुचेष्टेचे शब्द आहेत. कर्तबगार स्त्रीला म्हणायचे 'पुरुषी'. अरे वा रे वा! श्रृंगारात रस घेणारी स्त्री असली तर ती छचोर, छिनाल, सैल, चालू, घसटलेली, वाकडं पाऊल पडलेली, पोट वाढवणारी वगैरे. पण या पायरीपर्यंत तिला साथ देणाऱ्या पुरुषाचे असे भाषिक विच्छेदन नाही.

बायकी पुरुष कुणाला म्हणतात? कर्तबगार पुरुषाला नक्कीच नाही, तर कुचाळक्या, चहाडखोरपणा त्यात रस घेणाऱ्या पुरुषाला. 'उंबऱ्याच्या आतच राहणारी' बाई चांगली, तर 'घरकोंबडा' पुरुष टाकाऊ.

'बायकांची अक्कल चुलीपुरती! त्या अकलेचा आधार घेणारा पुरुष 'बाईलबुद्ध्या', 'बायकोच्या तालावर नाचणारा'. उलट 'नवऱ्याच्या अर्ध्या वचनात असणारी' हे मात्र स्तुतिसुमन ठरते.

'एक गेली किंवा (मेली) तर छपन्न मिळतील' हा आमच्या नवऱ्यांचा बाणा. उलट 'हा गेला तर दुसरा मिळेल' असं वाक्य इथल्या माणसांना कससंच वाटतं. ते बाईच्या तोंडी वाङ्मयातसुद्धा क्वचितच आढळतं. बाई ही मालमत्ता. बायकापोरे, गुरे-ढोरे, घरे-दारे हे सगळे आपण एका दमात म्हणू शकतो. ('आत्मानं सततं रक्षेत् दारैरपि धनैरपि' हा संकटकाळाबद्दल महाभारतातला उपदेश.) स्त्रीला 'माल' म्हणणे, मुलीस 'वस्तुलाभ' म्हणून सून करून घेण्याची भाषा, कन्येचे 'दान' करायचे, 'स्त्रीची अब्रू लुटणे' हे सर्व शब्दप्रयोग काय दाखवतात?

मात्र 'मातृशक्ती'चे कौतुक हा या सर्व स्त्री निंदेला सन्माननीय अपवाद. (पाश्चात्त्य परंपरेत तेही नाही, स्त्री ही नुसतीच 'सेक्स ऑब्जेट', भोग्यवस्तु.) पुरुषाला दिलेल्या सगळ्यात पॉवरबाज शिव्या तो त्याच्या कक्षेतल्या बायकांना शारीरिक उपमर्दापासून वाचवू शकत नाही हे सुचवणाऱ्या. पण त्यात हेही सूचित होते की एखाद्या बद्दलचा क्रोध दाखवण्याचा टोकाचा मार्ग म्हणजे त्याच्याशी संबंधित स्त्रीशी हिंसाचार करणे, प्रत्यक्षात करणे आणि ते जमण्यासारखे नसले तर भाषिक हिंसाचार, अत्याचार करणे.

अशा प्रत्येक 'सहज' केलेल्या शब्दप्रयोगागणीक स्त्रीचं माणूसपण तिळातिळानं ऱ्हास पावतं हे लक्षात ठेवावं. पाहा बरं स्वतःचा भाषाव्यवहार तपासून तो सुधारायला जागा आहे का?

**मूळ प्रकाशन :** 'भाषेतून दिसणारी स्त्री', **साधना** ३७ : १–२. २३–४, महिला समस्या विशेषांक, १५–०८–१९८४. (या लेखामधून थोड्या संक्षेपाने.)





अनुक्रमणिका

## जातिवाचक संबोधने–स्त्रियांमधली फूटपाडणी

**छाया दातार**

कामगार स्त्रियांचा अभ्यास करताना माझ्या समजुतीला धक्का बसला. धर्म–जाती वर्ग भेदापेक्षा एक अगदी वेगळा भेद, फार मूलभूत भेद स्त्रिया आपसात मानत असतात. हे माझ्या लक्षात आले. स्त्रियांमधील या जातीचे भान एवढ्या प्रखरतेने मला यापूर्वी जाणवले नव्हते.

या स्त्रियांमध्ये जेव्हा आपसात भांडणे लागली आणि एकमेकांना शिव्या देणे सुरू झाले, तेव्हा या भेदांचा गाभा माझ्या लक्षात येत गेला. एका बाईने दुसरीवर आरोप केला, "तू खोटारडी आहेस. कारण तू नवऱ्याची बायको नाहीस." 'नवऱ्याची बायको नाहीस' ही फार सर्वसाधारण शिवी होती. यालाच दुसरा शब्द होता 'उंडगी' किंवा 'उठवळ'. त्यानंतर 'रांड' हा शब्द फार प्रचलित होता. मग मी या सर्व शब्दांची यादीच करायला बसले. केवळ शिव्यांची यादी नव्हे. कारण या शिव्या वेगवेगळ्या वेळी, वेगवेगळ्या संदर्भात असत आणि माझ्या लक्षात आले, त्या त्या संदर्भावरून ती ती शिवी ही विशिष्ट जातिवाचक, पद्धतीने वापरली जाई. अर्थात येथे जाती शब्द फार व्यापक अर्थाने वापरला आहे.

लग्न करून नवऱ्याबरोबर व्यवस्थित संसार करणाऱ्या बाईची जात असते 'सती.' नवऱ्याने कितीही मारले, त्रास दिला तरी जी घराण्याची अब्रू राखते आणि नवऱ्या-जवळ रहाते ही बाई 'जबाबदार' समजली जाते. ती खोटे बोलण्याची शक्यता कमी कारण तिला प्रतिष्ठा असते. नवऱ्याची अब्रू, त्याच्या घराण्याची अब्रू तिला टिकवायची असते. शिवाय उद्या खोटे बोलणे नवऱ्याला कळले तर तो मारील ही भीती असते. थोडक्यात ती धाकात असते. म्हणजेच तिला लहान मुलासारखी वागणूक मिळत असते थोडक्यात; तिला स्वतःचा मान नसतो. ती नवऱ्याच्या प्रतिष्ठेच्या इमल्याच्या पायाचा दगड असते. परंतु इतर बायकांच्यात मात्र ती नवऱ्याच्या प्रतिष्ठेचा तुरा खोचून मिरवत असते. इतर स्त्रियांच्या हेव्याचा विषय बनते. तिचे सगळे व्यवस्थित आहे. अशी समजूत असते. म्हणूनच तिला 'सौभाग्यवती' म्हटले जाते.

नवऱ्याची बायको हा प्रतिष्ठेचा मानदंड मानल्यावर बाकी सर्व नवरा नसलेल्या स्त्रिया या नवरावालीच्या तुलनेत उतरंडीच्या खालच्या पायरीवर येतात. सतीच्या खालोखाल जात आहे. 'रांडेची.' रांड ही विधवा बाई. पण शिवी म्हणून जेव्हा ती वापरली जाते तेव्हा तिचा संदर्भ असतो 'बेवारस' म्हणून. नवरा मेल्यावर बाई जशी 'बेवारस' होते, तशी अनाथ, बेवारशी बाई म्हणजे 'रांड.' विधवा बाईला कोणी मालक नसतो, अधिकार सांगणारा कोणी नसतो. मात्र अशा परिस्थितीत तिला स्वतंत्र न समजता तिला बेवारशी ठरवून तिची प्रतिष्ठा सौभाग्यवतीपेक्षा कमी लेखली जाते. नवऱ्याला मारणारी म्हणून ती पांढऱ्या पायाचीही ठरते.

‘ रांडेच्या ’ खालोखाल जात आढळली ती ‘ उंडगी ’ किंवा ‘ उठवळ ’ ही. जी बाई नवऱ्याजवळ रहात नाही, नवऱ्याने मारहाण केली, दुसरी बायको केली म्हणून जी निघून जाते, स्वतंत्रपणे रहायला लागते ती उठवळ ठरते. चाकोरीतून न जाता जी बंड करते ती उठवळ असते. एका पुरुषाच्या जुलमी सत्तेखाली रहाण्याचे नाकारले म्हणजे जणू ती स्वैराचारासाठीच बाहेर पडली आहे असे समजले जाते.

चौथी जात आढळली ‘ चवचाल ’ म्हणून. जी बाई मोकळपणी वागते, पुरुषांशी मोकळेपणी बोलते, कलापथकामध्ये गाणी म्हणते ती वाईट चालीची असते. तिला मुलाबाळांची, नवऱ्याची काळजी करायला वेळ नसतो, ते विषय तिच्या डोक्यात घोळत नसतात म्हणून तिला टोचले जाते.

पाचवी जात आहे ‘ बाजारबसवी. ’ एखाद्या बाईला नवरा नीट वागवत नाही म्हणून ती सोडून निघून आली. पुढे तिला काम मिळाले नाही म्हणून एखाद्या पुरुषाशी घरोब्याचे संबंध करून राहिली तर ती ‘ बाजारबसवी ’ ठरते. वेश्येला तर बाजारबसवी शब्द वापरला जातोच पण नवरा सोडून एकाच माणसाबरोबर संबंध ठेवून राहणाऱ्या बाईलाही बाजारबसवी शब्दप्रयोग वापरला जातो. विवाहाच्या बाहेर कितीही प्रेमाचे, एकनिष्ठेचे संबंध ठेवले गेले तरी त्या संबंधांना स्त्रीच्या बाबतीत प्रतिष्ठा मिळत नाही. ते संबंध केवळ व्यापारी समजले जातात.

या पाच जातींच्या जोडीला आणखी एक जात आहे ‘ कुंवारीची ’ एखाद्या स्त्रीने अविवाहित राहण्याचा निर्णय घेतला तर तिला जणू पुरुषाने स्वीकारले नाही असं समजून तिच्या अस्पर्शित शरीराला कुंवार म्हणून हिणवले जाते. अनेक धार्मिक विधीत कुंवार स्त्रीला स्थान दिलेले नसते.

सती, रांड, उंडगी, चवचाल, बाजारबसवी व कुंवार या सहाही जातींमध्ये समान घटक आहे तो स्त्री-पुरुष संबंधांविषयी. पुरुषाशी स्त्रीचे संबंध कोणत्या प्रकारचे आहेत यावरून त्या स्त्रियांची जात निश्चित होते आणि या जाती सर्व वर्ग, सर्व धर्म आणि सर्व जाती यांचा आडवा छेद घेऊन निर्माण झालेल्या दिसतात. प्रत्येक धर्माच्या, वर्गाच्या व जातीच्या अंतर्गत स्त्रियांमध्ये वरीलप्रमाणे भेद कल्पिले जातात.

पुरुषाची पारख कधीही तो स्त्रीला कसे वागवितो यावरून होत नाही. पण स्त्रीला मात्र पुरुषाच्या ताब्यात राहाणे हा संकेत पाळावा लागतो.

गरिबातील गरीब बाई, जीवनाच्या काठावर उभी असलेली बाईसुद्धा त्या एका निकषावर एकमेकींना उणेदुणे बोलते, आणि प्रतिष्ठेच्या खोट्या अभिमानावर जगण्याचा प्रयत्न करते, तेव्हा मन भरून येते. त्याचवेळी त्यांच्यातीलच एक बाई उठून उभे राहून म्हणते “अग आपल्यापैकी ९० टक्के बायका अशाच आहेत. एकेकट्या कशाला उगीच एकमेकींचे नवरे काढताहात!” या तिच्या बोलण्यावर सगळ्याच मनमोकळ्या हसतात. आणि खोटे मानपान गळून पडतात.

**पूर्व प्रकाशन :** ‘ स्त्रियां ’च्या खास ‘ जाती ’, **रविवार सकाळ** (पुणे) २९-०७-१९८४, पृ. ६. ( या लेखामधून. )

# सरकारी नियमांचा मराठी अनुवाद : पडताळा पाहू / भाग तीन

गीता सुभाष भागवत

शासकीय कर्मचाऱ्यांना मोटार खरेदी करण्यासाठी शासनाकडून आगाऊ रक्कम घेता येते. ही रक्कम काढून घेण्यापूर्वी शासनाशी एक करार करणे आवश्यक असते. हा करार कायदेशीर बंधनाच्या स्वरूपाचा असल्यामुळे ह्यामधील भाषा अगदी काटेकोर व नि:संदिग्ध असणे आवश्यक आहे. पुढे अशा करारपत्राचा नमुना दिला आहे :

हा करार दिनांक ······ रोजी एका पक्षी श्री. ······ ( ज्यांना यापुढे " कर्ज घेणारा " असे संबोधण्यास आले असून, या संज्ञेत त्याचे वारस, प्रशासक, मृत्यु-पत्रव्यवस्थापक व वैध प्रतिनिधी यांचा समावेश होईल. ) आणि दुसऱ्या पक्षी महाराष्ट्राचे राज्यपाल ( ज्यांना यापुढे " राज्यपाल " असे संबोधण्यात आले असून त्या संज्ञेत त्यांच्या पदाचे उत्तराधिकारी व अभिहस्तांकिती यांचा समावेश होईल ) यांच्यामध्ये करण्यात आला आहे. ज्याअर्थी, मुंबई वित्तीय नियम, १९५९ ( यापुढे यात ज्यांचा उक्त नियम असा निर्देश करण्यात आला असून ज्या संज्ञेत त्यावेळी अंमलात असलेल्या त्यांच्यात केलेल्या कोणत्याही सुधारणांचा समावेश होईल. ) यांच्या उपबंधानुसार कर्ज घेणाराने मोटार वाहनाच्या खरेदीसाठी राज्यपालाकडे रु. ······ ( अक्षरी रु. ······ ) चे कर्ज मिळण्यासाठी अर्ज केला आहे. आणि राज्यपालांनी, यात पुढे अंतर्भूत केलेल्या अटी व शर्तींवर उक्त रक्कम कर्जाऊ देण्याचे मान्य केले आहे. त्याअर्थी आता, या करारपत्रातील पक्षकारांमध्ये याद्वारे असा करार करण्यात येत आहे की, राज्यपालांनी कर्ज घेणाराला दिलेल्या रु. ··· ··· च्या रकमेच्या मोबदल्यादाखल, कर्ज घेणारा, ( १ ) उक्त नियमात तरतूद केल्याप्रमाणे आपल्या वेतनातून मासिक कपातीद्वारे, उक्त नियमांनुसार परिगणना केलेल्या व्याजासह उक्त रक्कम देण्याचा आणि याद्वारे अशा कपाती करण्याबद्दल राज्यपालांना प्राधिकृत करण्याचा आणि ( २ ) उक्त रक्कम दिल्याच्या तारखेपासून एक महिन्याचे आत, उक्त कर्जाची संपूर्ण रक्कम मोटार वाहनाच्या खरेदीसाठी खर्च करण्याचा किंवा देण्यात आलेली प्रत्यक्ष रक्कम जर कर्जाच्या रकमेपेक्षा कमी होईल तर फरकाची रक्कम राज्यपालांना तात्काळ परत करण्याचा, आणि ( ३ ) वर निर्दिष्ट केल्याप्रमाणे कर्ज घेणारास कर्ज म्हणून देण्यात आलेली रक्कम व उक्त नियमान्वये तरतूद करण्यास आल्याप्रमाणे व्याज यांबद्दल उक्त मोटार वाहन राज्यपालाकडे तारणगहाण म्हणून

ठेवण्यासाठी लेख करून देण्याचा, याद्वारे राज्यपालाशी करार करीत आहे; आणि याद्वारे कबूल करण्यात आणि जाहीर करण्यात येत आहे की, उक्त रक्कम दिल्याच्या तारखेपासून एक महिन्याचे आत, मोटार वाहन खरेदी करण्यात व वर निर्दिष्ट केल्याप्रमाणे ते तारणगहाण म्हणून ठेवण्यात आले नाही किंवा मुदतीत कर्ज घेणारा नादार ठरेल किंवा शासनाची सेवा सोडील किंवा मरण पावेल तर, कर्जाची रक्कम आणि त्यावर उपार्जित होणारी व्याजाची रक्कम तात्काळ देय होईल व ती देण्यात येईल.

या लेखाच्या साक्षीदाखल, यात पूर्वी नमूद केलेल्या दिवशी व वर्षी कर्ज घेणाराने आपली सही केली असून, महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी ······ विभागाचे / कार्यालयाचे ··· ··· यांना आपल्याकरिता व आपल्या वतीने त्यांची सही व त्यांच्या कार्यालयाचा शिक्का करावयास लावला आहे.

उक्त व्यक्तींनी खालील व्यक्तींच्या समक्ष सही केली आहे.

यांनी सही केली ( कर्ज घेणाराची सही व पदनाम )

( साक्षीदाराची सही, नाव व पदनाम )

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्याकरिता व त्यांच्या वतीने

( अधिकाऱ्याची सही )

खालील साक्षीदारांच्या समक्ष

( साक्षीदाराची सही, नाव )

वरील करारपत्र खालीलप्रमाणे तयार केले तर कोणते अनर्थ ओढवतील? बंधनात पळवाट राहील का? राहिली असल्यास कशी बुजविता येईल?

या करारपत्रात कर्ज घेणाऱ्या व्यक्तीस 'कर्ज घेणारा' असे संबोधले आहे व त्या संज्ञेत कर्ज घेणाऱ्या व्यक्तीचे वारस, प्रशासक, मृत्युपत्रव्यवस्थापक व वैध प्रतिनिधी यांचा समावेश होईल.

या करारपत्रात 'महाराष्ट्राचे राज्यपाल' यांना 'राज्यपाल' असे संबोधले आहे. व त्या संज्ञेत त्या पदाचे उत्तराधिकारी व अभिहस्तांकिती यांचा समावेश होईल.

या करारपत्रात, 'मुंबई वित्तीय नियम, १९५९' यांचा उल्लेख 'संबंधित नियम' असा केला आहे व त्या संज्ञेत, त्यावेळी अंमलात असलेल्या व त्यांच्यात केलेल्या कोणत्याही सुधारणांचा समावेश होईल.

कर्ज घेणारा श्री. ······ याने, राज्यपालांकडे संबंधित नियमांच्या उपबंधानुसार मोटार वाहनाच्या खरेदीसाठी रु. ······ ( अक्षरी रु. ······ ) चे कर्ज मिळण्यासाठी अर्ज केला आहे. राज्यपालांनी या करारपत्रात नमूद केलेल्या अटींवर व शर्तींवर ती रक्कम कर्जाऊ देण्याचे मान्य केले आहे. यामुळे, एका पक्षी कर्ज घेणारा व दुसऱ्या पक्षी राज्यपाल यांच्यामध्ये, आज दिनांक ··· ··· रोजी, पुढील अटी व

शर्तींचे पालन करण्यात येईल असा करार करण्यात येत आहे.

**कराराच्या अटी व शर्ती**

( १ ) कर्ज घेणारा, संबंधित नियमांतील तरतुदीनुसार, संबंधित नियमांनुसार परिगणना केल्यावर येणाऱ्या व्याजासह, घेतलेली सर्व रक्कम, आपल्या वेतनातून मासिक कपातीद्वारे परत करील. अशा कपाती करण्यासाठी, या कराराद्वारे, राज्य-पालांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

( २ ) कर्ज घेणारा, कर्जाची रक्कम मिळाल्यापासून एक महिन्याच्या आत, त्या कर्जाची पूर्ण रक्कम मोटार वाहनाच्या खरेदीसाठी खर्च करील.

( ३ ) कर्ज घेणारा, मोटार वाहन खरेदीचा खर्च अर्जाच्या रकमेहून कमी असेल तर फरकाची रक्कम राज्यपालांना तात्काळ परत करील.

( ४ ) कर्ज घेणारा, ही कर्जाची रक्कम व तीवरील व्याज याबद्दल, खरेदी केलेले आपले मोटार वाहन राज्यपालाकडे तारणगहाण म्हणून ठेवण्यासाठी लेख करून देईल.

( ५ ) कर्जाची रक्कम दिल्याच्या तारखेपासून एक महिन्याच्या आत मोटार वाहन खरेदी करण्यास व वर निर्दिष्ट केल्याप्रमाणे तारणगहाण म्हणून ठेवण्यास आले नाही तर किंवा कर्ज घेणारा त्या मुदतीत नादार ठरेल, शासनाची सेवा सोडील किंवा मरण पावेल तर कर्जाची संपूर्ण रक्कम व तीवरील त्यावेळेपर्यंतचे व्याज तात्काळ देय होईल व देण्यात येईल.

उक्त व्यक्तींनी खालील व्यक्तींच्या समक्ष सही केली आहे.

.......................  .......................

( साक्षीदाराची सही )  ( कर्ज घेणाऱ्याची सही व पदनाम )

.......................

( नाव–पदनाम ) यांनी सही केली

.......................

.......................  .......................

( साक्षीदाराची सही )  ( अधिकाऱ्याची सही व पदनाम )

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्याकरिता व त्यांच्या वतीने

**द्वारा : भाषासंचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई ४०० ०३२**





अनुक्रमणिका

# पारंपरिक माध्यमांची एक मौखिक कैफियत

पारंपरिक संज्ञापन माध्यमे. लेखक : अशोक रानडे. पुणे : संज्ञापन आणि वृत्तपत्र विभाग, पुणे विद्यापाठ, १८९४, १५ पृष्ठे. रुपये ३.००

परीक्षणलेखक : श्यामला वनारसे

पुणे विद्यापीठाच्या संज्ञापन आणि वृत्तपत्र विद्या विभागाने संगीताचार्य अशोक रानडे यांना डॉ. सी. रो. जगन्नाथ स्मृति व्याख्यानासाठी ०९-१२-१९८३ रोजी बोलावले होते. त्या व्याख्यानाची ही पुस्तिका.

हे व्याख्यान चर्चेला पुष्कळ वाटा फोडून ठेवण्याच्या इराद्यानेच केलेले आहे. तसा त्यात उल्लेखही आहे. चर्चेचा गोषवारा नसल्याने या व्याख्यानाचे जे साक्षात फलित झाले असेल, ते पुस्तिकेच्या वाचकाला कळू शकत नाही, परंतु व्याख्यानातील जागोजाग सुचवलेल्या वाटा मात्र दिसतात ! (मौखिक घटनेचे लिखित घटनेत रूपांतर झाल्याने येणाऱ्या मर्यादा या वाचनातही आहेतच.)

संपर्क क्रियेचे व्यापक स्वरूप, संपर्कक्रियेची माध्यमे व साधने, परंपरेचे 'लोक' स्वरूप, संपर्कक्रियेची चार कार्ये, आणि मौखिक परंपरेच्या वैशिष्ट्यांमधील तर्कसंगती हे मुद्दे, उदाहरणे, स्पष्टीकरणे यांसहित या व्याख्यानामध्ये मांडले आहेत. त्या मांडणीला आणि भाषासरणीला व्याख्यान रंगवण्यासाठी येणाऱ्या वैशिष्ट्यांनी रोचक बनवले आहे.

व्याख्यानात वक्ता जेव्हा ठामपणे एखादी संगती मांडत असतो, तेव्हा त्याचे लक्ष लोकांना, श्रोत्यांना आपलेसे करून घेण्याकडे, त्यांच्यावर 'ताबा' मिळवण्याकडे असते. हा ताबा मिळवताना विनोद, समान पाया प्रस्थापित करणे, आणि चमकदारपणे एखाद्या समजुतीला धक्का देणे ही काही तंत्रे आहेत. रानडे ती वापरतात, आणि पहिल्याच मुद्द्याच्या विवेचनात ताबा मिळवतात. याचा उपयोग पुढचे व्याख्यान त्यांना हव्या त्या क्रमाने नेण्याकरता झालेला आहे. व्याख्यानात एकापाठोपाठ एक असे मुद्दे येत असल्याने ते समजून घेता घेता त्यांचे परीक्षण तिथल्यातिथे होत नसते. वक्त्याच्या विचारांचा प्रवाह एका दिशेने चालू असतो आणि त्याने श्रोत्यांवर एकदा

ताबा मिळवला की त्याला मिळणारा ' निर्भाषिक ' प्रतिसाद सामान्यपणे होकारार्थी असतो. ( यात श्रोत्यांचे अवधान, स्मित, माना डोलावणे हे सर्व आलेच. ) यातही कुठे शंका आली तर ताबा मिळवण्यासाठी ' बिनतोड ' मुद्दे, चपखल उदाहरणे यांचा वापर चालू असतो. ' आपल्याला असं दिसेल की—' अशा प्रकारचा वापर करूनही मी जे दाखवतो, तेच सर्वांना दिसेल असा सार्वत्रिकतेचा दावा त्यात गर्भित असतो.

हे मुद्दे या ठिकाणी लक्षात आणून देण्याचे कारण असे की, ' हे व्याख्यान छान झाले, त्याने आमच्या विचारात भर पडली ' असे मत हे व्याख्यानाचे, व्याख्यात्याचे यश असते. ते अलग करून विचारकाच्या हाती काय पडेल तिकडे माझे लक्ष गेले. विचार हे धन आहे, की क्रिया ? त्यात भर टाकायची की नेमकेपणा आणि सूक्ष्मता आणायची ?

या व्याख्यानातून वाचकांपुढे चर्चेसाठी जे प्रश्न उभे राहतील ते असे :

' ज्या तऱ्हेने आधुनिक काळामध्ये संपर्कक्रियेविषयी बोललं जातं त्यामधून देणं-घेणं ही क्रिया तितकी समोर येत नाही. ' असे रानड्यांनी म्हटले. आधुनिक संज्ञापन विचारात ' फीडबॅक ' – प्रतिसाद – याला जे महत्त्व आहे, संज्ञापन कौशल्यामध्ये नेमकेपणा आणणारी जी तंत्रविद्या विकसित झाली ती कशामुळे ? ही गोष्ट रानड्यांनी डोळ्यांआड का केली ? याचे उत्तर पुन्हा ' व्याख्यानाच्या ' चौकटीत जाते. मौखिक परंपरेचा मुद्दा मांडताना समोरासमोर होणाऱ्या देण्याघेण्याचा विचार त्यांना मांडायचा होता. आधुनिक आणि पारंपरिक यांतली फट वाढवण्यासाठी त्यांनी ही पाचर वापरली, पण ती टिकत नाही. आधुनिक आणि पारंपरिक यातला त्यांनी लक्षात घेतलेला भेद ' समोरासमोर ' आणि ' यंत्रामार्फत ' या प्रसंगभेदातून निर्माण होतो आणि ' अनुक्रमाने ' हे भेद वैचारिक आणि व्यावहारिक पातळीवरही उपस्थित होतात.

माध्यमाबाबत बोलताना त्यांनी म्हटले आहे, ' परंपरेच्या दृष्टीनं माध्यमं कुठली आहेत, हे पाहताना पंचेंद्रियांची भाषा वापरावी लागेल. कान, नाक, डोळे, स्पर्श इ. इ. म्हणताना माझ्याद्वारे जे काय असतं ती संपर्कमाध्यमे. मग याच्यामध्ये संपर्काच्या यंत्रणा तयार होतात त्यांना साधनं म्हणायचं. माध्यम व साधन यात भेद आहे. माध्यमाचा एक विशेष असा की एकच एक माध्यम कधीही विशिष्टपणे समोर येत नाही. ' याचा अर्थ कसा लावायाचा ! संपर्कक्रियेत प्रेषण-ग्रहण या क्रिया ' मी ' आणि दुसरा, मी आणि इतर अशा जोडीने, आलटून पालटून चालतात. त्यात ग्रहणसाधनं ( म्हणजे पंचेंद्रिये ) तीच माध्यमं ? मग माध्यम समोर येणे, एकाच वेळी अनेक माध्यमे समोर येणे या संकल्पनांचा बोध कसा करून घ्यायचा ? व्याख्यानाच्या ओघात हा उलगडा विचारत बसायला वाव न ठेवता रानडे चटकन् पारंपरिक

म्हणजे ' लोक– ' असा अर्थ लावण्याकडे कूच करतात.

वृत्तप्रसारण, भावस्थितीची निर्मिती, माहिती देणे, आणि कथन या कार्यांची परंपरेतील उदाहरणे देताना भाषिक आणि निर्भाषिक अशी दोन्ही प्रकारची उदाहरणे देऊन या व्याख्यानाचा एक महत्त्वाचा ऐवज पुरा केला आहे. यानंतर यात ठसवून सांगितलेले मुद्दे पारंपरिक संपर्कक्रियेचे विशेष रंगवून सांगणारे असे आहेत.

मौखिक परंपरा हा एक सांस्कृतिक निर्णय आहे आणि तिच्यात उणेपणा मानण्याचे कारण नाही असा पवित्रा या व्याख्यानाने घेतलेला आहे. काही ठिकाणी तर या निर्णयाबद्दल अभिमानही व्यक्त झालेला आहे. शब्दाला प्राधान्य, श्रवणाविषयी संकेत, शब्दाची प्रतिष्ठा, गुरू ही संस्था, नादाची प्रतिष्ठा, ' ओशाळेपणा न वाटता प्रबोधन करायची हौस ', एकमेकांची मनोधारणा बदलण्यासाठी संपर्क, हे हेतू, संमिश्रता हा गुण, ' करून बघण्यावर ' प्रयोगवैज्ञानिक भर , साचेबंद प्रतिक्रिया हेरणं, व्यक्तिवादाचे वावडेपण, आधुनिक काळातही सर्वांच्या सहभागावर आलेला भर ही वैशिष्ट्ये आणि त्यातील संगती रानडे एका पद्धतीने सांगत जातात.

प्रश्न असा पडतो की ही सर्व वैशिष्ट्ये म्हणजे इष्ट ' गुण ' आहेत का ? संपर्कक्रियेपुढे सामाजिक-सांस्कृतिक प्रसंगाने जी आव्हाने उभी केलेली असतात, त्यासाठी या सगळ्याचा उपयोग कोणता ? ही वैशिष्ट्ये फक्त मौखिक परंपरेची थोडीच आहेत ? लिहिलेल्या शब्दाला प्रामाण्य येण्याची कारणे त्या समाजाच्या सुरळीत व्यवहाराच्या गरजांशी निगडित आहेत. ' एकमेकांची मनोधारणा बदलण्यासाठी संपर्क ' हे वैशिष्ट्य घेऊ. ( हे परंपरेचे वैशिष्ट्य आहे का हा प्रश्न तूर्त आपण मागे सारू. ) ज्या समाजाबद्दल रानडे बोलत आहेत, त्याच्या अन्य साचेबंद व्यवस्था या संदर्भात महत्त्वाच्या आहेत. कोणी कुणाची मनोधारणा बदलावी याबद्दलही त्यातले संकेत महत्त्वाचे आहेत. आज्ञाधारकपणाच्या व्यवहाराशीही त्याचे नाते आहेच. बरोबरीचे दोघेजण जेव्हा एकमेकांच्या मनोधारणा बदलण्यासाठी संपर्क साधतात तेव्हा कुरघोडी, भांडखोरपणा, सभा जिंकण्याच्या क्लृप्त्या यामधे मूळ मुद्याचे काय होते ? एकमेकांना बदलण्यासाठी गेले आणि आपापली मते पक्की करून आले हा प्रकार घडतो याचा अनुभव सर्व प्रकारच्या परंपरांमध्ये येतो. त्यामुळे हे परंपरेचे वैशिष्ट्य म्हणता येत नाही, हे संपर्कक्रियेला उद्युक्त होताना व्यक्तीच्या दृष्टिकोणाचे, अभिमुखतेचे वैशिष्ट्य ठरते.

या प्रत्येक वैशिष्ट्याला अनेक संदर्भ आणि अनेक शक्यता आहेत. त्या व्याख्यानानंतरच्या चर्चेत उलगडल्या गेल्या असतील असे मानू. हे व्याख्यान वाचणे हा एक विचित्र अन्याय वाटतो, तो त्यामुळेच. त्यातल्या ठामपणाने विचारात भर घातली, की प्रश्न विचारायला प्रवृत्त केले ?

या वैशिष्ट्यांच्या विवेचनात रानड्यांनी ' एकूण समाज साचेबंद प्रतिक्रियांवर

जगत असतो. जे बंडखोर असतात ते समाजात राहातच नसतात.' असे म्हटले आहे. त्याचप्रमाणे, 'संपूर्ण समाजानं बंडखोर व्हायचं ठरवलं तर बंडखोर कुणीच उरणार नाही! म्हणून साचेबंद प्रतिक्रिया हेरायच्या, त्यांना निश्चित राबवणाऱ्या यंत्रणा उभ्या करायाच्या, त्यासाठी आविष्काराची तंत्रं वापरायची आणि सर्वांमागे कुठंतरी शिवकल्पनेचं कोंदण ठेयायचं ही पारंपारिक संपर्कक्रियेची योग्य अशी व्यूह-रचना आहे. आणि एकदा त्यात अडकल्यावर ती मान्यच करावी लागते. हीच त्याची ताकद आहे.' असेही त्यांनी म्हटले आहे. म्हणजे मनोधारणा बदलण्याचे काम जे 'बंडखोर' करत असतात किंवा करू इच्छीत असतात त्यांना या परंपरेत जागा नाही! म्हणजे संपर्क ही एक redundant गोष्ट झाली. ती नसली तरी सहज चालेल! साचेबंदपणाची ताकद आधुनिक संज्ञापनमाध्यमांनी तर किती अ-शिव रूपात शतगुणित करून दाखवली आहे.

ज्याला वेगळे काही दिसले आहे, जाणवले आहे, त्याचे ऐकायला जी परंपरा तयार नाही (असे रानडे म्हणतात) तिची ताकद कोणते शिवाचे कोंदण मिळवणार! परंपरेच्या ताकदीमधे लवचीकपणा आणि बंडखोरांना जागा करून देण्याच्या शक्तीचा समावेश करायला नको काय? आपल्या लोकपरंपरांमध्ये मिटवून टाकण्याला, सोडून देण्याला महत्त्व आहे, हा सर्वांचा आजदेखील अनुभव आहे की नाही? माणसे तोडून तत्त्वविचार पुढे नेता येत नाही हे शहाणपण या परंपरेमधल्या बंडखोरांनी दाखवले आणि माणूस जोडण्याच्या मान्यतेला धरून संपर्काचा धागा राखला. हाच लवचीकपणा मौखिकाबरोबरच काही लेखनामध्येही सुरुवात करून ठेवलेला दिसेल. परंपरेला रानड्यांनी उगाचच फार सोपे करून टाकले आहे.

मौखिक परंपरेला उचलून धरण्याचा किंवा आधुनिक संज्ञापन विचाराचा प्रतिवाद करण्याचे खरे तर काही कारण दिसत नाही. वक्तृत्वाचा पवित्रा एवढेच त्याचे निमित्त असेल तर गोष्ट वेगळी.

**सेंटर फॉर सायकोलॉजिकल सर्व्हिसिज, ११ त्रिमूर्ति, १२३/२/३ चिपळूणकर रस्त्याची गल्ली, पुणे ४११ ००४**

---

**करारांचे पथ्य**

साफ शर्ती, टिकाऊ मैत्री.

**एक इटॅलियन म्हण**

---





अनुक्रमणिका

## ‘ विश्रब्ध शारदा ’

ह. वि. मोटे यांनी संकलित आणि संपादित केलेल्या. १८१७ ते १९४७ या काल-खंडातल्या महाराष्ट्राच्या समाजजीवन आणि साहित्य कलाजीवन यांच्यावर प्रकाश टाकणाऱ्या पत्रांच्या संग्रहाला त्यांनी **विश्रब्ध शारदा** असे नाव दिले आहे. ( मुंबई १९७२ खंड २, १९७५ ). त्याच्या अगोदर मोटे चालवीत होते त्या **प्रतिभा** पाक्षिकात ‘ शारदेचा विश्रब्ध विहार ’ नावाचे पत्रसाहित्य देणारे सदर येत असे. ( १९३५. ०६. १४ च्या अंकापासून ) यातल्या ‘ विश्रब्ध ’ शब्दाचा अर्थ काय ?

— या दोन्ही ठिकाणी वाङ्मयांच्या दर्जाला पोचणाऱ्या पण प्रसिद्धीची अपेक्षा नसताना लिहिलेल्या पत्राचे वर्णन ‘ विश्रब्ध ’ या शब्दामध्ये अभिप्रेत आहे. ‘ विश्रम्भ विस्रम्भ ’ या संस्कृत धातूचा अर्थ ‘ विश्वास टाकणे ’, आशंका, चिंता, घाईगडबड यांपासून मुक्त असणे ’ असा आहे. ‘ विश्रब्ध ’ म्हणजे ‘ विश्वास टाकून असणारा. आशंका, चिंता, घाईगडबड यांपासून मुक्त असणारा ’. मूळ संस्कृतामधले संदर्भ ‘ विश्रब्ध नवोढा ’ (जिच्यामधली सुरुवातीची धास्ती व संकोच दूर झाला आहे अशी नववधू, नायिकेचा प्रकार ) ‘ विश्रम्भकथा ’ ( मनमोकळया गप्पा ) यांसारख्या शब्दांवरून दिसून येतात. याठिकाणी ‘ विश्रब्ध वाङ्मय ’ म्हणजे ‘ जे ’ लिहितो त्याला वाङ्मयरूप मिळून ते इतर मंडळी वाचणार आहेत हे भान नसल्यामुळे मन-मोकळेपणाने केलेले, वाङ्मयनिकषांची चिंता न बाळगता केलेले लेखन ’; आणि ‘ विश्रब्ध शारदा ’ म्हणजे ‘ वाग्देवतेचा असा विश्रब्ध आविष्कार ’





अनुक्रमणिका

## शिव्या द्या शिव्या

अशोक रा. केळकर कळवतात : मी मराठी भाषेत आणि तिच्या विविध उप-प्रकारांत जे अपशब्द शिव्या म्हणून, शाप म्हणून वापरले जातात, अशा प्रकारचे जे शब्दसमूह आणि वाक्ये वापरली जातात त्यांची पाहणी करत आहे. औद्योगीकरण, नागरीकरण, शिक्षण यांच्या प्रवाहात हे सांस्कृतिक पाथेय नाहीसे होण्याची शक्यता आहे. ( दुर्दैवाने त्याची जागा प्रत्यक्ष हिंसक कृती अधिकाधिक घेत आहे. ) आतापर्यंतचा अनुभव असा की मंडळी लाजतात, किंवा पहिली गंमत ओसरली की त्यांचा उत्साह मावळतो. ज्यांना खरोखरीच माहिती पुरवण्याची इच्छा आहे त्यांनीच संपर्क साधावा. एकदम धाडकन याद्या पाठवू नयेत. शिस्तशीरपणे दिलेल्या माहितीचाच संशोधकाला उपयोग असतो; सहकार्याबद्दल ऋणनिर्देश अवश्य केला जाईल. पत्ता : ए–२, परिमल, १२३९–ए आपटे रस्ता, पुणे ४११ ००४.



## भेटीचा साभार स्वीकार

**आवर्त** . शैक्षणिक चळवळीला वाहिलेले मासिक. २ : ४ ऑगस्ट १९८४. ( मानद संपादक : श्री. नाना कळंत्रे ).

## लेखकांसाठी सूचना

**भाषा आणि जीवन :** २ : १, हिवाळा १९८४, पृ. ५५-६ वर तपशिलवार सूचना दिलेल्या आहेत त्या अवश्य पाहून सहकार्य करावे ही विनंती.

## भाषाविषयक लेखन पारितोषिकासाठी साहित्य पाठवा

**भाषाविषयक लेखन पारितोषिकाचा** वृत्तांत याच अंकात ' परिषद वार्ता 'त आहेच. आता १९८२ ८३ या कालावधीतील भाषाविषयक लेखनासाठी द्यावयाच्या पारितोषिकासंबंधीची कार्यवाही सुरू झाली आहे. या पारितोषिकासाठी वरील कालावधीतील भाषाविषयक लेखन पाठवा अथवा कळवा. पारितोषिकाची नियमावली परिषदेच्या चिटणीसांकडे २ रु. पाठवून मागवून घ्या.

परिषद्-वार्ता

( १ ऑगस्ट १९८३ पासून १५ सप्टेंबर १९८४ पर्यंत )

## ' भाषा आणि जीवन 'च्या पहिल्या अंकाचे प्रकाशन

मराठी अभ्यास परिषद स्थापन होऊन समविचाराची मंडळी एकत्रित आल्यानंतर त्यांना विचारांची देवाणघेवाण सुलभ व्हावी आणि संस्थेच्या कार्याचा प्रसार सुलभ व्हावा यासाठी एका नियतकालिक पत्रिकेची गरज भासू लागली. त्याप्रमाणे मराठी अभ्यास परिषद पत्रिका ही त्रैमासिक म्हणून ' भाषा आणि जीवन ' या नावानें निघावी म्हणून ठरले. जुळवाजुळव होऊन जुलै १९८३ चा पहिला अंक बाहेर पडायला ८ सप्टेंबर १९८३ उजाडला. महाराष्ट्र मराठी माध्यमिक शिक्षक संघाच्या सहकार्याने राज्यशिक्षणशास्त्र संस्था, पुणे यांच्या सभागृहात प्रसिद्ध अर्थवैज्ञानिक डॉ. वि. म. दांडेकर यांच्या हस्ते पहिल्या अंकाचे प्रकाशन झाले.

संस्थेचे चिटणीस प्रा. प्र. ना. परांजपे यांनी संस्थेच्या कार्याचा आढावा घेताना मराठीचे कार्य ही लोकांची चळवळ कशी होईल, शासनापासून फटकून न राहता, पण त्याचबरोबर शासनावर विसंबून न राहता काम पुढे किती नेता येईल यावर संस्थेचा भर कसा आहे हे स्पष्ट केले. पत्रिकेचे संपादक डॉ. अशोक केळकर यांनी पत्रिकेच्या अंतरंगाविषयी सांगितले. ते म्हणाले, "एका फ्रेंच राजनीतिज्ञाने म्हटले आहे की, युद्ध ही एवढ्या महत्त्वाची गोष्ट आहे की ती फक्त सेनापती मंडळींच्या भरवशावर सोडता येत नाही; भाषा आणि जीवन यांचा एवढा गहिरा संबंध आहे की ती बाब केवळ भाषातज्ज्ञ आणि मराठीचे प्राध्यापक यांच्यावर सोपवून भागणार नाही."

आपल्या नर्मशैलीतील भाषणाला डॉ. दांडेकर यांनी ' सामाजिक विज्ञाने आणि मराठी भाषा ' हा विषय माझ्या चाकोरीबाहेरचा असल्यामुळे नर्व्हस वाटते आहे अशी सुरुवात करून दोन महत्त्वाचे मुद्दे मांडले. पहिला मुद्दा होता की अरुंद कक्षा ठेवून तज्ज्ञ होण्यापेक्षा सर्वसामान्य विद्यार्थ्यांनी व्यापक पायावरून भौतिक शास्त्रे, सामाजिक शास्त्रे, आणि भाषा यांचे अध्ययन करणे उपयुक्त ठरावे. भाषाशिक्षण म्हणजे केवळ साहित्याचा अभ्यास नसावा, भाषा व्यवहाराचे माध्यम असते याचीही दखल त्यात असावी. दुसरा मुद्दा म्हणजे ओढूनताणून सुमार दर्जाची नवनिर्मिती मराठीत करण्यापेक्षा परभाषेतील उत्तम ग्रंथाचे प्रस्तावना, टिपा जोडलेले भाषांतर करणे अधिक मोलाचे आहे. संशोधन-पदवीसाठीसुद्धा अशा कामाला मान्यता देता येईल.

शिक्षकसंघाचे कार्यकर्ते श्री. कृ. गो. तथा वासू देशपांडे यांनी आभार मानल्यावर कार्यक्रम संपला. (हा वृत्तांत तयार करताना **श्रमिक विचार** दि. १०–९–१९८३ मधील आशा मुंडले यांनी दिलेला वृत्तांत उपयोगी पडला हे साभार नमूद करायला पाहिजे.)

## परिसंवाद : परदेशी भाषा का शिकाव्या आणि कशा शिकाव्या ?

रानडे इन्स्टिटयूट परिसर, पुणे येथील सभागृहात २१–१–१९८४ रोजी संध्याकाळी हा परिसंवाद झाला. त्यात जपानी, रशियन, जर्मन, फ्रेंच भाषा शिकवणाऱ्या अध्यापकांनी भाग घेतला व डॉ. अशोक केळकर यांनी समारोप केला. विस्तृत वृत्तांत **भाषा आणि जीवन** २ : १ हिवाळा १९८४ मध्ये प्रा नीती बडवे यांनी दिलेला आहेच.

## परिसंवाद : साहित्य संमेलनात व्यक्त झालेली भाषाविषयक जाणीव

गेल्या दोन तीन वर्षांपासून मराठी संमेलनातून मराठी भाषेच्या संदर्भात आस्थे-वाईकपणे विचार होऊ लागला आहे. बार्शी येथील सा. संमेलनात भाषाविषयक परिसंवाद आयोजित करण्यात आला होता. आंबेजोगाई येथील साहित्य संमेलनात मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने काही भाषाविषयक ठराव पाठवण्यात आले व त्यानंतर बरीच चर्चाही झाली होती. मुंबईच्या पर्यायी साहित्य संमेलनातही मराठी भाषेसंबंधी निबंधवाचन व चर्चेचा कार्यक्रम झाला. यंदाच्या (जाने० १९८४) जळगाव येथील साहित्य संमेलनाने याही पुढे जाऊन भाषाविषयक परिसंवाद तर आयोजित केलाच, पण त्यातील भाषणांची एक पुस्तिकाही प्रसिद्ध केली. तसेच काही महत्त्वाचे असे भाषाविषयक ठरावही मंजूर केले. स्वागताध्यक्ष श्री. मधुकरराव चौधरी यांनी मराठीसाठी स्वतंत्र संस्था असली पाहिजे अशी इच्छा प्रकट केली. तर आणखी विशेष म्हणजे मराठी अन्याय निर्मूलन परिषदेनेही आपलं अधिवेशन या संमेलनाला जोडूनच घेतलं होतं. त्यातही मराठी भाषेच्या संदर्भात बराच विचारविनिमय झाला. या सर्व घटनांचा आढावा पुणेकरांना द्यावा व त्याचबरोबर त्या निमित्ताने प्रकट झालेल्या भाषिक जाणिवांसंबंधी विचारवंतांच्या प्रतिक्रिया समजून घ्याव्यात म्हणून अभ्यास परिषदेने दि. २८-२-१९८४ रोजी एक परिसंवाद रानडे इन्स्टिटयूटच्या सभागृहात आयोजित केला होता. परिसंवादाचा विषय ‘साहित्य संमेलनात व्यक्त

झालेली भाषाविषयक जाणीव ' हाच होता. जळगावच्या साहित्य संमेलनातील भाषाविषयक परिसंवादातील काही वक्ते या परिसंवादास उपस्थित होते. त्यांच्यापैकी डॉ. नरेश कवडी यांनी अध्यक्षस्थान स्वीकारून सभेचं सूत्रसंचालन केलं. डॉ. अशोक केळकर, डॉ. अंजली सोमण, डॉ. गं. ना. जोगळेकर व प्रा. प्र. ना. परांजपे हे प्रमुख वक्ते होते. त्याशिवाय डॉ वा.ना. दांडेकर, डॉ. श्रीरंग संगोराम, श्रीमती आशा मुंडले, श्री. पटवर्धन, डॉ. कल्याण काळे यांनीही चर्चेत भाग घेतला.

प्रारंभी मराठी अभ्यास परिषदेचे कार्यवाह प्रा. प्र. ना. परांजपे यांनी या परिसंवादाची पार्श्वभूमी विशद केली व चर्चेसाठी ठळक मुद्दे श्रोत्यांच्या व वक्त्यांच्या पुढे ठेवले. जळगावच्या परिसंवादाचे अध्यक्ष आणि मराठी अन्याय निर्मूलन परिषदेचे एक प्रमुख कार्यकर्ते या उभयविध नात्यांनी डॉ. गं. ना. जोगळेकरांनी जळगावच्या विचारविनिमयाचा आढावा श्रोत्यांच्या पुढे ठेवला. जळगावच्या परिसंवादाच्या काही चांगल्या बाजू व तशाच काही अनुचित बाजूही त्यांनी श्रोत्यांच्यासमोर मांडल्या. संमेलनात मंजूर झालेल्या ठरावांचीही त्यांनी चर्चा केली. जळगावच्या साहित्यसंमेलनाचे स्वागताध्यक्ष डॉ. मधुकरराव चौधरी यांनी 'मराठा विकास संस्थेचा' पुरस्कार केला असताना विषयनियामक समितीच्या कामकाजात मात्र 'स्वतंत्र मराठी विद्यापीठाच्या' मागणीचा ठराव मंजूर झाला. त्यातील तांत्रिक मुद्द्यांचं त्यांनी विश्लेषण केलं. त्यांच्यामते जळगावचं साहित्यसंमेलन मराठीविषयक जाणीव निर्माण करण्याच्या दृष्टीने खूपच उपयुक्त ठरले. डॉ. अंजली सोमण यांनी साहित्यसंमेलनातील भाषाविषयक परिसंवाद हा एकमेव चांगला परिसंवाद कसा ठरला हे सांगून त्यात प्रकट झालेल्या काही परस्परविरोधी मतप्रवाहांचं स्वरूप स्पष्ट केलं. शिक्षणाच्या माध्यमासंबंधी विद्वानांत अजूनही गोंधळ आहे. कोणी मराठीचा आग्रह धरतात. कोणी इंग्रजीचा पक्ष उचलून धरतात तर कोणी तडजोडवादी आहेत. परिसंवादात बोललेल्या वक्त्यांमध्ये काही वक्त्यांनी भाषाविषयक विचार जाणीवपूर्वक मांडले तर काहींचे अज्ञान व गैरसमजच व्यक्त झाले हेही त्यांनी सांगितलं. मराठी विद्यापीठाची मागणी कशी अव्यवहार्य आहे याबद्दलही त्या बोलल्या. त्याशिवाय मराठी निर्मूलन परिषदेच्या कामकाजासंबंधीही त्या बोलल्या. अन्याय निर्मूलन परिषदेने आपला कार्यक्रम अधिक भरीव करण्याची आवश्यकता त्यांनी प्रतिपादन केली. डॉ. अशोक केळकरांनी उत्सवी संमेलनांच्या जोडीला अभ्यासू संमेलनांची आवश्यकता सांगितली. संमेलनात श्री. लक्ष्मण माने यांनी साडेतीन टक्क्यांची भाषा म्हणून प्रमाण भाषेचा अधिक्षेप केला होता त्याचा संदर्भ देऊन डॉ. केळकरांनी प्रमाण भाषा ही बोली भाषांना वगळून नसते तर त्यांचा समावेश करणारी संपर्क भाषा कशी असते हे समजावून सांगितलं. त्यानंतर त्यांनी पुरस्कृत केलेल्या मराठी विकाससंस्थेची कल्पना समजावून सांगितली आणि शासकीय प्रयत्न होणार नसतील

तर खाजगी पातळीवर ह्या संस्थेसाठी प्रयत्न झाला पाहिजे, असा विचार मांडला. संमेलनात मंजुरी मिळालेल्या स्वतंत्र मराठी विद्यापीठाचं स्वरूप व कामकाज कसं असावं यासंबंधीही त्यांनी आपले विचार व्यक्त केले

मुख्य वक्त्यांच्या भाषणानंतर त्यावर चर्चा करणारी भाषणं झाली. डॉ. वा. ना. दांडेकरांनी मराठीची स्थिती सुधारण्याच्या संदर्भात मार्गदर्शन केलं. मराठीवरील इंग्रजीच्या आक्रमणाचा धोका स्पष्ट करून तो टाळण्यासाठी ठोस प्रयत्न करण्याचं आवाहनही केलं. डॉ. श्री. दा. संगोराम यांनी मराठीची घटत चाललेली लोकप्रियता, निष्काळजीपणाने बोलण्याच्या प्रवृत्ती यासंबंधी स्वतःचे अनुभव सांगितले. श्रीमती आशा मुंडले यांनी प्रमाण मराठी शिकविण्याच्या सोयी उपलब्ध करून देण्यावर भर दिला तर डॉ. जोगळेकरांनी मराठीसंबंधी कार्य करणाऱ्या मराठी अन्याय निर्मूलन परिषद व मराठी प्राध्यापक संघटना यांची माहिती दिली. श्री. पटवर्धनांनी इंग्रजी माध्यमांच्या शाळांच्या लोकप्रियतेची कारणमीमांसा करून मराठी शाळांनीही आपला दर्जा सुधारल्यास त्यांनाही यश मिळेल असा विचार मांडला. अध्यक्ष डॉ. नरेश कवडी यांनी सर्व चर्चेचं समालोचन करून मराठीविषयक जाणीव समृद्ध करण्याच्या संदर्भात होत असलेल्या प्रयत्नांबद्दल समाधान व्यक्त केलं.

## परिषदेची इतर प्रकाशने

पत्रिकेखेरीज पुस्तकंही प्रकाशित करण्याची कल्पना आहे. इंग्लिश माध्यमातून मराठी शिकू इच्छिणारांसाठी पुस्तकं या अगोदर काढली आहेतच. त्यासाठी थैली-बळ आणि लेखणीबळ यांची नितांत आवश्यकता आहे. सहकारी प्रकाशनाची शक्यता आहेच.

परिषदेच्या कामाला पोषक अशा पाच चिकटचिठ्ठ्या रंगीत, आकर्षक स्वरूपात काढल्या आहेत. प्रत्येकी २ रु. पडतील. पाच चिठ्ठ्यांचा एक असे पाच संच घेणाराला २५ टक्के सूट मिळेल.

## महाबँक भाषाविषयक लेखन पारितोषिक १९८३

परिषदेच्या उद्दिष्टांना पूरक अशा लेखनकार्याला उत्तेजन मिळावे म्हणून महाराष्ट्र बँकेच्या आर्थिक पाठबळाने एक पारितोषिक-योजना परिषदेने पूर्वीच जाहीर केली होती. या योजनेखालील पहिले म्हणजे १९८३ चे पारितोषिक १९८१-८२ या कालामधील लेखनाला मिळायचे होते. डॉ. अशोक रा. केळकर, डॉ. मु. श्री. कानडे,

प्रा. मे. पुं. रेगे यांच्या परीक्षक समितीने पुढील दोघांना एक हजार रुपयांचे हे पारितोषिक विभागून द्यावे अशी शिफारस केली आहे.

(१) डॉ. सु. बा. कुलकर्णी, नागपूर (दोन लेख : बोलीभाषांचा अभ्यास १९८१, भाषिक परिवर्तन १९८२).

(२) प्रा. मिलिंद स. मालशे, मुंबई (चार लेख : साहित्याभ्यासाची शैलीलक्षी पद्धत : सहलेखक १९८१, वर्णनात्मक भाषाविज्ञान पद्धती १९८२, भाषाविज्ञान व इतर अभ्यासक्षेत्रे १९८२, भाषा : स्वरूप, कार्य व अभ्यास १९८२).

दि. २९ सप्टेंबर १९८४ रोजी सुप्रसिद्ध भाषावैज्ञानिक डॉ. ना. गो. कालेलकर यांच्या हस्ते या दोघांना हे पारितोषिक देण्याचा कार्यक्रम झाला. पारितोषिक विजेत्यांचे मनःपूर्वक अभिनंदन!

१९८४ चे पारितोषिक १९८२-८३ या कालावधीतील लेखनाला मिळायचे आहे. त्यासाठी परीक्षक मंडळाचे कामकाज सुरू झाले आहे. अप्रकाशित स्वीकृत प्रबंधांचाही विचार होऊ शकेल. (जिज्ञासूंनी परिषदेच्या चिटणीसांशी संपर्क साधावा.)

## परिषदेच्या त्रैमासिक पत्रिकेचे स्वागत

**भाषा आणि जीवन**चे अंक जसजसे प्रसिद्ध होत गेले तसतशा अनेक वाचकांनी तोंडी, पत्र लिहून आणि प्रकट मुद्रित स्वरूपात आपल्या प्रतिक्रिया नोंदविल्या. अतिशय आपुलकीने चुका दर्शविल्या आणि विधायक सूचनाही केल्या. (तसे म्हटले तर हा सूचनांचा प्रेमळ शिडकाव मराठी अभ्यास परिषदेची पत्रिका निघणार आहे ही बातमी पसरल्यापासून सुरू झाला होता! त्यातली एक सूचना विशेष लक्षात राहण्यासारखी होती—हे नियतकालिक मुख्यतः भाषेबद्दल राहणार हे उघड आहे पण साहित्याची हिरवळही अधूनमधून त्यात भेटली तर बरे वाटेल.)

काही पत्ररूपाने आलेल्या आणि छापून आलेल्या प्रतिक्रिया संक्षेपाने पुढे दिल्या आहेत.

सुंदर संपादन. मुद्रण सुबक. (डॉ. ना. ग. जोशी, वडोदरा)

अंक चांगला. परिषदेच्या कार्याला नियतकालिक आवश्यक (वि. वा. शिरवाडकर, नाशीक)

लेख मुद्देसूद, आटोपशीर. अनेक पैलूंचे मनोरंजक दर्शन होते. आकर्षक मांडणी आणि रंजकता यामुळे सामान्य वाचकालाही आवडेल. (विश्राम बेडेकर व मालती बेडेकर, मुंबई)

आज अनेक गुजराती माणसे दिसतात की त्यांना गुजराती नीट येत नाही, तिचे महत्त्व वाटत नाही, अगदी सोपी व निरुपयोगी भाषा वाटते. दुसरीकडे

इंग्रजीचे वर्चस्व वाढत आहे. जी स्थिती गुजरातीची आहे तीच मराठीसारख्या इतर प्रादेशिक भाषांचीही आहे. मराठीची ही स्थिती होऊ नये, तिचा विकास व्हावा, तिला समाजात महत्त्वपूर्ण स्थान मिळावे असे डॉ. अशोक केळकर यांच्यासारख्या विचारवंताना वाटते आणि त्यांनी मराठी अभ्यास परिषद नावाची संस्था पुण्यात स्थापन केली आहे. ही संस्था व्याख्याने आयोजित करते. आता **भाषा आणि जीवन** हे नियतकालिकही सुरू केले आहे. गुजरातीसाठी देखील अशा संघटित कार्याची जरूर आहे. (गुलाबदास ब्रोकर, **मुंबई समाचार साप्ताहिक**, १८-९-१९८३ मधील स्तंभ, मूळ गुजरातीवरून)

अंक आगामी अंकाची उत्सुकतेने वाट पाहावी असाच आहे. ( डॉ. नरेश कवडी, मुंबई )

रेखीव, आटोपशीर, कसदार ( पुरुषोत्तम पाटील, धुळे )

संपूर्ण वाचून काढला. आवडला. ( रवींद्र केळेकर, म्हार्दोळ, गोवा ).

स्वभाषिकांचा अभ्यास नव्या पायावर उभा करण्याची गरज वाटते आहे. तेव्हा परभाषिकांना मराठी शिक्षणाचे किंवा परभाषिकांच्या मराठी लेखनाचेच नमुने स्वभाषिकांच्या मराठीच्या अभ्यासाला उपयोगी ठरणार की नाही याचा विचार हवा. एरव्ही या गोष्टींना किती स्थान द्यायचे ? मराठी भाषिकाने व मराठीच्या अभ्यासकाने अंतर्मुख होऊन विचार करावा अशी सामग्री पहिल्या अंकात आलेली आहे. एकूण मराठी भाषिक आपल्या भाषेबद्दल किती कळवळा बाळगतात ? अशा लोकांकडे ‘ भाषा आणि जीवन ’ सर्रास पोचू शकेल तर ! ( **आलोचना**, नोव्हेंबर १९८३ ).

पहिल्या अंकातील संपादकीयामधील भूमिकेचा प्रत्यय पहिल्या अंकात लगेच मिळतो आहे. इतक्या विविध गोष्टी इतक्या थोड्या अवकाशात आलेल्या पाहून शुभेच्छा व्यक्त करणे व या चळवळीत सर्वांनी सहभागी होण्याचे आवाहन करणे क्रमप्राप्तच आहे. ( ओमप्रकाश होळीकर, **अनुष्टुभ्**, सप्टेंबर-ऑक्टोबर १९८३ ).

सुमन बेलवलकरांचा ललित लेख आवडला. श्यामविमल यांची कविता आवर्जून देण्याची कल्पनाही आवडली. ( राजीव नाईक, मुंबई )

मराठी भाषेची अभिवृद्धी करावयाची असेल तर ती सर्व मराठी माणसांच्या जीवनाशी मिसळून गेलेली असली पाहिजे. म्हणून ‘ भाषा आणि जीवन ’ नाव सार्थच आहे. हा फक्त शाळा-महाविद्यालयात शिकविण्याचा विषय नाही. मराठी भाषिकाला हे ‘ माझे त्रैमासिक ’ आहे असं प्रेमानं म्हणायला लावण्याची गोडी त्यात आहे. मराठीच्या अध्यापकांनी ते नियमित वाचण्यासाठी सदस्य व्हावे; कारण जाणते होऊन आपल्याला मराठीचा आस्वाद घ्यावयाचा आहे, अभ्यास करावयाचा आहे. (डॉ. चं. द. इंदापूरकर, **महाराष्ट्र मराठी अध्यापक**, जून १९८४)

दि. के. बेडेकरांचे चिंतन पुनर्भेट म्हणून छापून आपण फार चांगली रीत

पाडली आहे. ( विद्युत् भागवत, पुणे )

जून महिन्यात हिवाळी अंक हाती आल्यामुळे शिरशिरी आली ! मुखपृष्ठाच्या मोरानेही हिवाळ्यात पिसारा उभारला आहे. भाषेची मजल ऋतुचक्रात क्रांतिकारक बदल करण्याइतकी जावी काय ? अंक आवडला. बर्न्सनबाईंचा लेख आणि सोबतची रेखाचित्रे यांनी वर्गणी वसूल झाल्यासारखे वाटले. आपण एकूण अभ्यासू मंडळींपर्यंत वात्रटपणा पोचवण्याचे आणि वात्रट मंडळींना अभ्यासाला लावण्याचे कार्य अंगीकारले आहे. त्याला हार्दिक पाठिंबा. लहानपणी अत्र्यांच्या नवयुगवाचनमालेत 'शेवटचा धडा' वाचला होता. तेव्हापासून काही प्रतिमांसकट मनात घर करून राहिलेला. परत इतक्या वर्षांनी वाचून पुनःप्रत्ययाचा आणि ताजेपणाचा आनंद झाला. ( अरुण खोपकर, मुंबई )

'जीव घाबरा करणारी भाषा' केवळ मराठीतच आहे हा समज बरोबर आहे काय ? डॉ. विजया चिटणीस यांचा अनुभव वाचला. हा फरक राहणारच. तथापि प्रमाण मराठी सर्व महाराष्ट्रात एकच असावी असे आपणांस वाटत नाही काय ? पं. श्रीकांत बहुलकर यांनी संस्कृतबद्दल दिलेली माहिती आम्हांस पाहिजे होतीच. धन्यवाद. ( डॉ. वि. म. गोगटे, नाशीक )

सामान्य लोकांना न कळणारे लेखन वाढवण्याऐवजी भाषा समृद्ध करण्याचा, भाषेसंबंधी प्रत्यक्ष ज्ञान वाढवण्याच्या ह्या प्रयत्नाबद्दल जवळीक वाटली. ( डॉ. सुशीला अंबिके, दिल्ली )

अंक मिळताच एका बैठकीत त्याचा फडशा पाडतो. ( या 'फडशा' शब्दावर टिपण लिहिण्यासारखं आहे ! ) ( श्री. बा. जोशी, कलकत्ता )

डॉ. भीमराव कुलकर्णी म्हणतात, "डॉ. अशोक केळकरांच्या संपादकत्वाखाली गेल्या वर्षी सुरू झालेल्या 'भाषा व साहित्य' [ यथामूल ! ] या त्रैमासिकाने त्याच्या नावाशी संबंधित अशा विषयांचे प्रवर्तन सुरू केले आहे. आटोपशीरपणा, नेटकेपणा, साक्षेप व वेगळेपणा या दृष्टीने त्यातील लेखांची मांडणी व निवड लक्षात राहण्यासारखी असते." ( संपादकीय, **महाराष्ट्र साहित्य पत्रिका** अंक २२९, एप्रिल–जून १९८४ )

पत्रिकेला दाद मिळण्याचा आणखी एक प्रकार पत्रिकेमधल्या लेखनाचे इतर ठिकाणी पुनर्मुद्रण होण्याचा. ( पुनर्मुद्रण करू इच्छिणाऱ्यांनी लेखक आणि संपादक यांची अनुमती अगोदर घ्यावी आणि पुनर्मुद्रण करताना **भाषा आणि जीवन** च्या अमुक अंकात मूळ प्रकाशन झाले याची आवर्जून नोंद करावी. )

## परिषदेचा आर्थिक अहवाल

मराठी अभ्यास परिषदेचे संक्षिप्त आयव्ययपत्रक स्थापनेपासून म्हणजे १९८२ सालाचे आणि नंतर १९८३ सालाचे इथे देत आहोत.

## १९८२ सालचा जमाखर्च

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मागील शिल्लक | | नाही | खर्च रुपये | | |
| जमा रुपये | | | कार्यालयीन खर्च | | ३७१.९० |
| सभासद वर्गणी एकूण | | ३९१०.०० | छपाई खर्च | | ८०९.०० |
| सामान्य ७४ सभासद | १११०.०० | | बँक वटणावळ | | २.०० |
| आजीव ९ सभासद | १८००.०० | | | एकूण खर्च | ११८२.९० |
| आश्रयदाता १ सभासद | १०००.०० | | एकूण पुढील शिल्लक | | २७८९.७० |
| बचतखाते व्याज | | ६२.६० | वचतखाते शिल्लक | २७६६.६० | |
| | एकूण जमा | ३९७२.६० | रोकड शिल्लक | २३.१० | |
| | | | | खर्च अधिक पुढील शिल्लक | ३९७२.६० |

## १९८३ सालचा जमाखर्च

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मागील शिल्लक रुपये | | २७८९.७० | खर्च रुपये | | |
| जमा रुपये | | | कार्यालयीन खर्च | | २०२०.८५ |
| सभासद वर्गणी एकूण | | १२८१५.०० | छपाई खर्च एकूण | | १३१३५.०० |
| सामान्य १०६ सभासद | १९६५.०० | | पत्रिका १ अंक | १९८२.०० | |
| आजीव ४१ सभासद | ८३५०.०० | | पुस्तक छपाई | १००००.०० | |
| देणगीदार १ सभासद | ५००.०० | | इतर छपाई | ११५३.०० | |
| आश्रयदाता २ सभासद | २०००.०० | | बँक वटणावळ | | २९८.०० |
| पत्रिकावर्गणी एकूण | | ३३५.०० | ग्रंथालीला पुस्तक विक्रीपोटी | | ९७५०.०० |
| संस्था ६ वर्गणीदार | २००.०० | | | एकूण खर्च | २५२०३.८५ |
| १९८३ ची व्यक्तिगत वर्गणी | १३५.०० | | एकूण पुढील शिल्लक | | १८४५६.४५ |
| जाहिरात–आकार ( ३ ) | | ११००.०० | | | |
| बचतखाते व्याज | | ६२०.६० | | | |
| पुस्तक विक्री | | २६०००.०० | | | |
| | मागील शिल्लक अधिक जमा | ४३६६०.३० | | खर्च अधिक पुढील शिल्लक | ४३६६०.३० |










हा आढावा घेतल्यावर आणि १५.०९.१९८४ अखेरची स्थिती बघता **भाषा आणि जीवन** साठी सभासद वर्गणीदार, संस्था वर्गणीदार, आणि जाहिरातदार यांची संख्या बरीच वाढण्याची गरज आहे. परिषदेच्या सभासदांनी ही वाढ करण्याचे कसोशीने प्रयत्न करणे जरूर आहे. प्रत्येक सभासदाने स्वतःबरोबर एकतरी नवा वर्गणीदार / संस्था वर्गणीदार / जाहिरातदार मिळवून देण्याचे मनात आणले तर हे अवघड नाही.

## परिषदेच्या सभासदांची यादी

या ठिकाणी फक्त १ ऑगस्ट १९८३ ते १५ सप्टेंबर १९८४ या काळात नव्याने झालेल्या आजीव, देणगीदार, आणि आश्रयदात्या सभासदांची यादी देण्यात आली आहे. ( आधीची यादी अंक १ : १ मध्ये दिली आहेच. )

३१. डॉ. पीटर हुक, ॲन आर्बर, यु. स्टे.
३२ डॉ. ग्युंटर झॉंटहायमर, हायडेलबर्ग, पश्चिम जर्मनी
३३. डॉ. चंद्रकांत दत्तात्रय इंदापूरकर, पुणे
३४. डॉ. वि. रा. करंदीकर, पुणे
३५. श्री. रवींद्र केळेकर, म्हार्दोळ, गोवा
३६. डॉ शरद खरे, पुणे
३७. श्री. श्रीकृष्ण वि. खडपेकर, नयी दिल्ली
३८. श्री. रा. भा. गुप्ते, पुणे
३९ डॉ. मो. स. गोसावी, नाशीक
४०. डॉ. सु. रा. चुनेकर, पुणे
४१. डॉ. गं. ना. जोगळेकर, पुणे
४२. श्री. महादेव विनायक जोशी, मुंबई
४३. श्री. र. कृ. जोशी, मुंबई
४४. डॉ. सुरेश दामोदर जोशी, देवरूख
४५. श्रीमती सरोज टिकेकर, पुणे
४६. श्री. जया दडकर, मुंबई
४७. श्री. य. चिं. देवधर, पुणे
४८. डॉ. बा. ग. देशपांडे, पुणे
४९. श्री. आनंद नारायण नारळकर, पुणे
५०. श्री. एरीको नेदेव, अहमदनगर
५१. डॉ. भालचंद्र नेमाडे, औरंगाबाद
५२. श्रीमती नीती बडवे, पुणे
५३. श्री. राहुल बारपुते, इंदौर
५४. डॉ. सुधाकर मराठे, हैदराबाद
५५. श्रीमती वसुधा माने, तळेगाव-दाभाडे
५६. श्री दिनेश द. माहूलकर, बडोदरा
५७. श्री. नि. ना. रेळेकर, सांगली
५८. श्री. वि. बा. शिरवाडकर, नाशीक
५९. डॉ. उषा गोपाळ शिराळकर, नागपूर
६०. श्री. शंकर सारडा, सातारा
६१. श्री. संजय माधव आचार्य, चौल
६२. श्री. नरेंद्र आपटे, डोंबिवली





अनुक्रमणिका

६३. श्रीमती चारुशीला ओक, मुंबई
६४. श्री. वि. मा. कुलकर्णी, पुणे
६५. श्री. मोहन चितळे, पुणे (देणगीदार)
६६. श्रीमती गौरी देशपांडे, मुंबई ( आश्रयदाता )
६७. श्रीमती सरोज पटवर्धन, पुणे
६८. श्री. अनिल चिमणलाल ब्राजवाला, पुणे
६९. श्री. वसंत भास्कर भट, पुणे
७०. श्रीमती पुष्पा अनंत भावे, मुंबई
७१. श्रीमती आशा मुंडले, पुणे
७२. डॉ. रमेश शिपुरकर, संकेश्वर
७३. श्रीमती रोहिणी भाटे, पुणे
७४. श्री. दीपक पित्रे, राजाळे, ता. फलटण
७५. श्री. अशोक दा. रानडे, पुणे
७६. श्रीमती कांचन वेंद्रे, पुणे
७७. डॉ. हे. वि. इनामदार, पुणे
७८. श्रीमती सुशिला अंबिके, दिल्ली
७९. डॉ. विजय बेडेकर, नौपाडा, ठाणे
८०. डॉ. मु. श्री. लद्दू, पुणे
८१. श्री. निळूभाऊ लिमये, पुणे
८२. डॉ. कल्याण काळे, पुणे
८३. डॉ. मु. श्री. कानडे, पुणे
८४. श्रीमती नीलिमा रड्डी, पुणे
८५. श्री. नागनाथ कोत्तापल्ले, औरंगाबाद
८६. श्री. ह. श्री. शेणोलीकर, धुळे
८७. श्री. दिगंबर यशवंत लेले, पुणे

याखेरीज सामान्य सभासदांची संख्याही वाढती आहे. पण ती अजून वाढायला पाहिजे.

परिषदेने योजलेले विविध कार्यक्रम पुण्यात आणि **पुण्याबाहेर** सुद्धा राबवायचे आहेत. उदाहरणार्थ, पुण्याबाहेरच्या ठिकाणी चर्चामंडळे, अभ्यासमंडळे स्थापणे; प्राथमिक आणि माध्यमिक शाळांतील भाषाशिक्षकांच्या, विशेषतः स्वभाषा किंवा परभाषा म्हणून मराठी शिकवणाऱ्या शिक्षकांच्या, अडचणी समजावून घेऊन त्यांना मार्गदर्शन करणे; निरनिराळ्या पाहण्या करणे. यासाठी परिषदेला केवळ सभासद मिळणे आणि आर्थिक स्थैर्य मिळणे पुरेसे नाही. निरलस, कल्पक, विचारी कार्यकर्त्यांची गरज आहे ( ज्यांची काम करायची इच्छा आहे त्यांनी संपर्क साधावा. )

## पत्रिकेचे संस्था–ग्राहक

प्रथम १५.९.१९८४ अखेर झालेल्या संस्था-वर्गणीदारांची यादी दिली आहे.

१. जामिया उस्मानिया, हैदराबाद ५०००००७
२. मानव्य आणि वाणिज्य महाविद्यालय, इगतपुरी ४२२४०३
३. मानव्य आणि वाणिज्य महाविद्यालय, देवळा ४२३१०२
४. मानव्य आणि वाणिज्य महाविद्यालय, मनमाड ४२३१०४




अनुक्रमणिका

५. चं. ह. चौधरी मानव्य आणि शं. गो. पाटील वाणिज्य महाविद्यालय, तळोदे ४१५४१३
६. डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅजुएट ॲंड रीसर्च इन्स्टिटयूट, पुणे ४११००६
७. न्यामू. तात्यासाहेब आठल्ये मानव्य आणि वेमू. शं. रा. सप्रे वाणिज्य महाविद्यालय, देवरूख ४१५८०४
८. पाटणकर मानव्य आणि वाणिज्य महाविद्यालय, गोरेगाव पश्चिम, मुंबई ४०००६७
९. भिकूसा यमासा क्षत्रिय वाणिज्य महाविद्यालय, नाशीक ४२२००५
१०. मराठी विश्वकोश कार्यालय, वाई ४१२८०३
११. महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्चमाध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे ४११०१०
१२. महाराष्ट्र राज्य शिक्षणशास्त्र संस्था, पुणे ४११०३०
१३. श्रीशिवाजी महाविद्यालय, बारशी ४१३४०१
१४. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई ४११०१४
१५. भाषाविकास-प्रकल्प, मुंबई महानगरपालिका, मुंबई ४०००००७
१६. विलिंग्डन महाविद्यालय, विश्रामबाग, सांगली ४१६४१५
१७. जे. एस्. एम्. महाविद्यालय, अलीबाग ४०२२०१
१८. श्रीमती चं. बा. शहा महिला महाविद्यालय, सांगली ४१६४१६
१९. श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महाविद्यालय, पुणे ४११०३८
२०. शिक्षण महाविद्यालय, शिवाजीनगर, नाशीक ४२२००२
२१. पुतळाबेन शहा शिक्षण महाविद्यालय, सांगली, ४१६४१६
२२. विद्यावर्धिनी सभेचे मानव्य वाणिज्य महाविद्यालय, धुळे ४२४००१

याखेरीज पुढील नियतकालिकांशी पत्रिकेचा विनिमयाबद्दलचा ठराव झालेला आहे.

१. परामर्श (मराठी त्रैमासिक), तत्त्वज्ञानविभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११००७
( ५ : १ मे १९८३ या अंकापासून )

## हसूही नका रडूही नका...

भाषा आणि जीवन २ : २–२८–२९, उन्हाळा १९८४ मध्ये कर्नाटक टूरिझमची एक जाहिरात पुनर्मुद्रित करून त्यावर संपादकीय भाष्य केले होते. त्यावर पुण्याचे श्री. नंदा नारळकर यांचे पत्र आले आहे ते पुढे देत आहोत –

'कर्नाटक टुरीझम'च्या जाहिरातीतील भीषण मराठीची दखल घेतलीत हे चांगले केलेत. असा मराठीचा जाहिरातीतील मागोवा घ्यायचा ठरवलात तर तो एक धंदाच करावा लागेल, इतक्या मोठ्या प्रमाणात हा प्रकार चालू आहे. जाहिराती मुख्यतः इंग्रजीत तयार होतात. नंतर अन्य भारतीय भाषांत त्यांचे भाषांतर होते. हाच त्यातला नेमका दोष आहे. जाहिरातीचा विचार एका भाषेत व उद्गार दुसऱ्या यामुळे धेडगुजरी प्रकार तयार होतो. भारतातल्या सर्व भाषांबाबत हे असे होतेच, पण इंग्रजीचे युरोपिअन भाषांत भाषांतर करतानाही होते, पण प्रमाण फार कमी आहे. (जाहिरातीच्या धंद्यात इतर सर्व धंद्याप्रमाणे अमराठी मंडळीचाच भरणा आहे.)

मोठे जाहिरातदार भारतभर धंदा करत असल्यामुळे सर्व व्यवहार, विचार, उद्गार इंग्रजीतूनच होतो. जाहिरात एजन्सीज पण साहजिकपणे इंग्रजीतूनच व्यवहार करतात आणि जरूर असेल त्याप्रमाणे अन्य भारतीय भाषेत मूळ इंग्रजी 'कॉपी'चे भाषांतर निराळ्या भाषांतर करणाऱ्या एजन्सींकडून करून घेतात. मुख्य एजन्सीमध्ये जे महत्त्वाचे अधिकारी असतात त्यांना इंग्रजीशिवाय एखादीच भाषा येते त्यामुळे इतर भाषेत झालेल्या भाषांतरांचा अचूकपणा व दर्जा तर राहोच, पण शुद्धाशुद्ध पण त्यांना समजत नाही. भाषांतर करणाऱ्यांची ती मातृभाषा असूनही इतके वाईट भाषांतर सर्वच कसे करतात हे कोडेच आहे. जाहिरातीचा मूळ विचारच जर मराठीत (किंवा त्या त्या भाषेत) झाला, तर जाहिरात जास्त चांगली प्रभावी होते व वाचली जायचा संभव वाढतो.

हे सगळे एवढ्यासाठी लिहिले की 'कर्नाटक टुरीझम' इतके वाईट नसले तरी पुष्कळ जाहिरातीत वाईट, चुकीचे, व अशुद्ध मराठी आढळते. आपल्या 'परिषदे'तर्फे त्यांचा पाठपुरावा करण्याचा उपक्रम हाती घ्यावा असे सुचवितो. अर्थात ज्यांच्या जाहिराती अशुद्ध असतील त्यांच्या नजरेला त्या चुका आणावयाच्या असतील तर पत्रव्यवहार मुख्यतः इंग्रजीतच करावा लागेल!





अनुक्रमणिका

'कर्नाटक टुरीझम' जाहिरात पाहिल्याबरोबर मला पण चीड आली. मी लगेच यांच्या मुख्य अधिकाऱ्याला पत्र लिहून ही जाहीरात एजन्सी डिसमिस करावी असा कडक सल्ला दिला होता. अपेक्षेप्रमाणे उत्तर आलेच नाही. एक ग्रंथ व भाषाप्रेमी श्री. अरुण आठल्ये यांनी पण आपला निषेध नोंदवला होता असे श्री. पु. ल. देशपांडे म्हणत होते. इतरही काहींनी अशी पत्रे पाठवली असावीत. कारण मला उत्तर आले नाही तरी सुमारे एक महिन्याने तीच जाहिरात बहुतेक सर्व अशुद्धे काढून पुन्हा छापली गेली.

तुमच्या टिप्पणीत 'महाराष्ट्र टाइम्स'वर केलेली टीका योग्य नाही. वृत्तपत्रात छापल्या जाणाऱ्या जाहिराती – विशेषतः मोठ्या जाहिरातदारांच्या – मॅट्रिक्स किंवा ब्लॉकने छापल्या जातात. त्या वृत्तपत्रांच्या मुद्रणालयात कंपोज होत नाहीत. त्यामुळे अशा जाहिरातील मजकुरांचे शुद्धाशुद्ध पाहणे शक्यच होत नाही. आणि संपादकीय खात्याचा त्याचा संबंधच नसतो. जाहिरात छापताना कोठल्याही कायद्याचा भंग होत नाही ना एवढेच पाहण्याची जबाबदारी वृत्तपत्रांवर असते. उदा. वजनामापाचा कायदा, अश्लीलतेचा, बदनामीचा इत्यादी.

मला वाटते अशी उपरोधिक पण अज्ञानजन्य टीका करून आपण '**महाराष्ट्र टाईम्स**' वर अन्याय केला आहे. आपण दिलगिरी व्यक्त करणे उचित होईल.

[श्री. नंदा नारळकर यांच्या पत्रामुळे काही तात्त्विक व व्यावहारिक प्रश्न उपस्थित होतात. मूळ इंग्रजी मसुद्याचे मराठी भाषांतर जाहिरात म्हणून देणे, ते भाषांतर परिपूर्ण नसणे हे सगळे समजू शकते. युरोपियन भाषांबद्दल थोडी तरी काळजी घेतली जाते, पण देशी भाषांतून वाटेल तितका गचाळपणा खपेल असे मानले जाते. या स्थितीची श्री. नारळकर व अरुण आठल्ये यांना चीड येऊन त्यांनी चोख काम बजावले याबद्दल अभिनंदन !

कोणत्याही कायद्याचा भंग होऊ न देणे एवढ्याने वृत्तपत्राची जाहिरातींबद्दलची जबाबदारी संपत नाही. प्रत्येक वृत्तपत्राचे याबद्दल काही स्वतःचे दंडक असतात. उदाहरणार्थ, मुक्त भांडवलशाहीचा पुरस्कार करणाऱ्या रीडर्स डायजेस्टनेही सिगारेटच्या जाहिराती छापणे बंद केले, मटक्याच्या 'जाहिराती' काही वृत्तपत्रे छापत नाहीत. प्रत्येक जाहिरातीमधले किरकोळ दोष पाहत बसणे व्यवहार्य नसले तरी इतकी ढोबळपणाने गचाळ असणारी जाहिरात पैशाचा मोह दूर सारून नाकारणे मोठ्या वृत्तपत्राच्या जाहिरात-विभागाला अशक्य नाही.

मराठीखेरीज इतर देशी भाषांच्या बाबतीतही आनंदच आहे. सोलस : जर्नल ऑव्ह द ॲडव्हर्टायझिंग क्लब बॉंबे मध्ये १९७६ साली याबद्दल लेखमालाच आली होती. वाटेल ते खपणार नाही ही जाणीव जाहिरात देणारे आणि छापणारे या दोघांना करून द्यायला पाहिजे ती अखेर जागरूक वाचकांनी ? — संपादक ]

### पैसे भरण्याबद्दल सूचना

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. मनीऑर्डरने किंवा चेकने पैसे पाठविल्यास ते प्रा. प्र. ना. परांजपे, चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, ११८ आगरकर नगर, पुणे ४११००१ या पत्त्यावर पाठवावे. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम आणि ती कशापोटी पाठवली ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास तसा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत २ रु. वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

### पत्रिकेची वर्गणी

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. १९८४ पासून वर्षाला चार अंक निघतील.

| | १९८३ साठी | १९८४ साठी |
|---|---|---|
| परिषदेचे सामान्य सभासद (सभासद-वर्गणी धरून) | १५ रु. | ३० रु. |
| इतर व्यक्ती आणि संस्था वर्गणीदार | २० रु. | ४० रु. |

सुट्या अंकाला १० रु.

### परिषदेची वर्गणी

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला तर इतर सभासदांनी केवळ १५ रु. भरावयाचे आहेत. उदाहरणार्थ एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ३० रु. + १५ रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी २०० रु. (परदेशी अंक पाठवायचा असल्यास शिवाय १०० रु.); देणगीदारासाठी ५०० रु. किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी १००० रु. किंवा जास्त. (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

### जाहिरातीसाठी दर

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु, पाव पान २५० रु, शुभेच्छासूचना १०० रु., आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

सस्नेह नमस्कार, विशेष विज्ञापना

'भाषा आणि जीवन'
ही तुमची पत्रिका आहे ना?
ती निर्वेधपणे चालावी असे वाटते ना?

तर मग निदान —
१९८४ व १९८५ ची वार्षिक वर्गणी
(स्मरणपत्राची वाट न पाहता)
वेळेवर भरून टाका!

आणि शिवाय
एक तरी नवा सभासद
नवा संस्था-वर्गणीदार
जाहिरातदार
मिळवून द्या!

आणि हो —
पत्रिकेसाठी लिहापण
(स्मरणपत्राची वाट न पाहता)
निदान पानपूरके पाठवा
आणि कात्रणे
आणि अनुवाद
आणि उतारे
कदाचित चित्रंही, चित्रांसाठी कल्पना ...

पत्रिका आमची थोडीच आहे!
ती आपली आहे! परिषद आपण आहोत!

आपले,
पत्रिकेचे संपादक आणि व्यवस्थापन

